# नवभारत

ऑगस्ट २०११

युयुत्सु

अर्थशास्त्र आणि नैतिकता

शेतीप्रधान देशात शेतीचीच उपेक्षा

संहिताचिकित्साशास्त्र आणि लीळाचरित्राची संपादने

आंबेडकरोत्तर दलित राजकारणाचे बदलते संदर्भ

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्‌मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**– संपादक मंडळ**

वर्ष ६४। अंक ११। ऑगस्ट २०११
श्रावण/भाद्रपद शके १९३३
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.













अनुक्रमणिका

# नवभारत

## ऑगस्ट २०११

## अनुक्रमणिका

# युयुत्सु

प्रा. म. अ. मेहेंदळे

राजकारणात दोन घटना अनेकवार घडताना दिसतात – पक्षांतर आणि सभात्याग. दोन्ही प्रकारांना सुरुवात महाभारतापासून झालेली दिसते.

पांडवांनी केलेल्या राजसूय यज्ञाच्या वेळी युधिष्ठिराने श्रीकृष्णाची अग्रपूजा केली. त्यामुळे संतापलेल्या शिशुपालाने आपला निषेध नोंदविण्यासाठी सभात्याग केला. भारतीय इतिहासात नमूद झालेला हा पहिला सभात्याग.

पक्षांतराचेही पहिले उदाहरण महाभारतातच आढळते. युद्ध सुरू होण्यापूर्वी युधिष्ठिराने कौरवपक्षाला उद्देशून एक आवाहन केले – "कौरवांकडील ज्या कुणाला आमच्या पक्षाला साहाय्य करण्याची इच्छा असेल, त्याने आमच्या पक्षात यावे." या आवाहनाला कौरवपक्षीय युयुत्सुने प्रतिसाद दिला. कौरवांचा पक्ष सोडून तो पांडवांना मिळाला. इतिहासात नमूद असलेले हे पहिले पक्षांतर.

पण कौरवांकडे 'युयुत्सु' नावाचे दोन योद्धे होते. पक्षांतर करणारा हा युयुत्सु कोण?

धृतराष्ट्राला एका वैश्यवर्णीय दासीपासून पुत्रप्राप्ती झाली होती. त्याचे नाव 'युयुत्सु'. जनमेजयाने वैशंपायनांना विचारल्यावरून ह्या युयुत्सूच्या जन्माची हकीकत त्यांनी जनमेजयाला सांगितली. जनमेजय म्हणाला : "गान्धारीसारखी क्षत्रियकुलोत्पन्न सहधर्मचारिणी धृतराष्ट्राला असताना त्याच्याकडून एका वैश्य स्त्रीपासून मुलाला जन्म देण्याचे गैरवर्तन कसे घडले?" (कथं ... धृतराष्ट्रोऽत्यवर्तत १.१०७.४). तेव्हा वैशंपायनांनी त्याला माहिती दिली ती अशी : गांधारीला गर्भधारणा झाल्यावर ती वेळेवर प्रसूत झाली नाही. तिच्या उदरात गर्भ दोन वर्षे राहिला. त्या दरम्यान एक वैश्य स्त्री धृतराष्ट्राची सेवाचाकरी करीत होती. तेव्हा धृतराष्ट्राला त्या वैश्य स्त्रीपासून पुत्र झाला, तो 'युयुत्सु' (१.१०७.३५-३६).

हा युयुत्सु दुर्योधनापेक्षा वयाने मोठा होता. तो धृतराष्ट्राला त्याच्या विवाहित स्त्रीपासून झाला नव्हता. ज्या वैश्य स्त्रीने त्याला जन्म दिला, ती धृतराष्ट्राची सेवा करणारी, म्हणजे दासी होती. ह्या युयुत्सूचा उल्लेख महाभारतात 'वैश्यापुत्र' किंवा 'करण' असा होतो ('करण' म्हणजे क्षत्रियाला वैश्य स्त्रीपासून झालेली संतती).

धृतराष्ट्राला 'युयुत्सु' या नावाचा आणखी एक मुलगा होता. तो गान्धारीचा मुलगा, दुर्योधनाचा सख्खा भाऊ अत एव क्षत्रिय. वैशंपायनांनी एकदा धृतराष्ट्राच्या शंभर मुलांची नावे त्यांच्या ज्येष्ठानुज्येष्ठतेनुसार जनमेजयास सांगितली. त्या यादीत युयुत्सूचे नाव दुर्योधनानंतर आणि दुःशासनाच्या आधी येते (दुर्योधनो युयुत्सुश्च राजन् दुःशासनस्तथा १.१०.८.२). म्हणजे हा युयुत्सु दुर्योधनापेक्षा वयाने लहान.

कौरवांकडे असे हे दोन युयुत्सु होते. तेव्हा पक्षांतर करणारा युयुत्सु कोण – वैश्यापुत्र की गांधारीपुत्र, असा प्रश्न निर्माण होतो.

पांडवांकडे जाऊन पक्षांतर ज्याने केले, तो दुर्योधनाचा सख्खा भाऊ गांधारीपुत्र युयुत्सु असला पाहिजे, वैश्यापुत्र युयुत्सु नव्हे, असे म्हणण्यास अनेक कारणे आहेत. पक्षांतर करून युयुत्सु पांडवांकडे येतो, तेव्हा युधिष्ठिर त्याचा उल्लेख 'राजपुत्र' असा करतो (६.४१.९४). तो वैश्यापुत्र असता तर युधिष्ठिर तसे म्हणाला नसता. खेरीज महाभारतात इतर काही सूचना अशा आहेत की, ज्यांवरून पक्षांतर करणारा युयुत्सु गांधारीपुत्र असावा, असे अनुमान करता येते. पक्षांतर करणाऱ्या युयुत्सूला उद्देशून युधिष्ठिर म्हणतो, "ये राजपुत्रा, ये. आपण सर्व मिळून तुझ्या मूर्ख भावांशी युद्ध करू. तू आमच्याकडे आल्यामुळे धृतराष्ट्राचा निर्वंश होण्याची भीती राहिली नाही. त्याला द्यावयाचा पिंड आणि त्याची वंशवृद्धी तुझ्यात टिकून राहील (त्वयि पिण्डश्च तन्तुश्च धृतराष्ट्रस्य दृश्यते ६.४१.९३)." विवाहबाह्य संबंधामुळे वैश्य बाईपासून जन्मलेल्या युयुत्सूला उद्देशून युधिष्ठिर असे म्हणेल, असे वाटत नाही. धृतराष्ट्राच्या मृत्यूनंतर युयुत्सूला पुढे करून पांडवांनी धृतराष्ट्राला तोयाञ्जली वाहिली, असे

म्हटले आहे (१५.४७.१२) तत्पूर्वी दुर्योधनादिकांची प्रेतकार्ये करण्याची व्यवस्था करण्यास युधिष्ठिराने ज्यांना सांगितले, त्यांत धौम्य, सूत संजय, विदुर यांच्याबरोबर युयुत्सूचा उल्लेख आहे (११.२९.२५).

ह्या संदर्भात आणखीही एक उल्लेख महत्त्वाचा आहे. हास्तिनपुर सोडून गान्धारीसह वनवासात तप करायला जाण्यास धृतराष्ट्र निघतो, तेव्हा शोकाकुल झालेला युधिष्ठिर धृतराष्ट्राला उद्देशून म्हणतो : "तू वनात जाऊ नकोस, ह्या तुझ्या 'औरस' मुलाला – युयुत्सूला – राजा होऊ दे. त्याच्यामार्फत तूच राज्य कर. मी वनात जातो." यावरून असे म्हणता येते, की युद्धाच्या आधी कौरवपक्ष सोडून पांडवांकडे आल्यामुळे वाचलेला युयुत्सू (१४.५९.३३) हा धृतराष्ट्राचा औरस मुलगा, म्हणजेच गान्धारीपासून झालेला मुलगा होता. धर्मपत्नी-पासून झालेल्या मुलाला 'औरस' अशी संज्ञा आहे (मनु.-९.१६६; याज्ञवल्क्य २.१२८), धृतराष्ट्राला वैश्या बाईपासून झालेला मुलगा तो त्याचा औरस पुत्र होता, असे म्हणता येणार नाही.

परंतु हेही लक्षात घ्यायला हवे, की भारतीय युद्धानंतर जो एकच कौरव उरला, त्याचा उल्लेख महाभारतात 'वैश्यापुत्र' असाही होतो (१५.१.५; १५.२१.८). राज्य केल्यावर अखेरीस वल्कले परिधान करून युधिष्ठिर स्वतःच जेव्हा इतर पांडवांसह वनात जायला निघतो; तेव्हा त्याने त्याचे राज्य वैश्यापुत्र याला दिले असे म्हटले आहे (१७.१.६). त्यामुळे पक्षांतर करून वाचलेला युयुत्सु हा वैश्यापुत्र होता, असे म्हणावे लागते.

या संभ्रमामुळे पक्षांतर करून पांडवांकडे आलेला युयुत्सु कोण, हे कोडे कायमच राहते.





अनुक्रमणिका








# अर्थशास्त्र आणि नैतिकता

श्री. सी. पं. खेर

औद्योगिक क्रांती व त्यातून उद्‌भवलेली यंत्रोत्पादक कारखानदारी तसेच मालक आणि मजूर असे भेद दाखवणारी भांडवलशाही यांतून म्हणजे अठराव्या शतकापासून आर्थिक सिद्धान्तनाची सुरुवात झाली. येथवर परंपरेने समाजमानसावर धर्माचा, पापपुण्याचा, मूल्यांचा बहुतांश पगडा असल्याचे दिसून येते. वैयक्तिक आणि सामाजिक नीतिमत्तेची चाड सुरुवातीच्या अर्थसिद्धान्तनाने गृहीत धरलेली असावी. परंतु कालांतरात हा दुवा निखळलेला दिसतो. त्याच्या कारणांचे व परिणामांचे विवेचन करण्याचा या लेखाचा उद्देश व प्रयत्न आहे.

२

अर्थशास्त्र हे सुरुवातीस राजकीय (राजनीतिक/धोरणाभिमुख) अर्थशास्त्र होते. म्हणजे नीतिमत्तेपासून त्याची फारकत झालेली नव्हती. ॲडम स्मिथ हे आधुनिक अर्थशास्त्राचे जनक मानले जातात. त्यांचा "राष्ट्रांची संपत्ती" (वेल्थ ऑफ नेशन्स) हा ग्रंथ १७७६ चा. त्याआधी त्यांनी "नैतिक भावनांचा सिद्धान्त" (थिअरी ऑफ मॉरल सेंटिमेंट्स) हा ग्रंथ १७५९ साली प्रसिद्ध केला होता. पण यावरून या दोन्ही ग्रंथांमधील प्रत्यक्ष संबंध दाखविता येत नाही. "नैतिक भावनांच्या सिद्धान्ता"त व्यक्ती काम करण्यास प्रवृत्त होते, ती आर्थिक हित साधण्यासाठी नव्हे; तर प्रतिष्ठा, मानमरातब, दर्जा, ऐपत, आदर मिळविण्यासाठी. पण "राष्ट्रांच्या संपत्ती"त कामाच्या प्रेरणेमागे व्यक्तीला स्वतःचे हित साधावयाचे असते, असे स्मिथ यांनी प्रतिपादिले आहे. स्वहित साधत असतानाच व्यक्ती अदृश्यपणे (अदृश्य हाताकडून) सर्वांचे-समाजाचे–कल्याण साधत असते. कल्याण याचा अर्थ असा, की व्यक्तीचे कष्ट (क्लेश) कमी व्हावेत व सुख (समाधान) वाढत राहावे. उत्पादन, वस्तुसेवांची निर्मिती मुबलकपणे वाढत राहावी व आर्थिक विकास होत राहावा, हा अर्थव्यवस्थेचा हेतू होय.

अठराव्या शतकात, पाश्चिमात्य आर्थिक विचारावर दोन धर्मांचा – जुडाइसम व ख्रिश्चॅनिटी – प्रभाव होता. ज्यूंच्या धर्मात अर्थव्यवहारात "न्याय", – योग्य वर्तणुकीस-महत्त्वाचे स्थान होते. नैतिकतेस किंवा आध्यात्मिकतेस त्यांनी डावललेले नव्हते. स्वहितात नैतिकतेचा (दुसऱ्याचा, सहानुभूतीचा) विचार अनुस्यूत होता. तसे त्या वेळी ख्रिश्चॅनिटीत नव्हते. 'सहानुभूती ही धर्माधिष्ठित नसून ती स्वहिताप्रमाणे मानवी सहजप्रवृत्ती आहे', असेच स्मिथ यांचे मत होते.[१] दुसऱ्याबद्दल प्रेम, आदर, सहानुभूती, करुणा बाळगणाऱ्या संपूर्ण मानवाचा विचार "नैतिक भावनांच्या सिद्धान्ता"त येतो, तर "राष्ट्रांच्या संपत्ती"त धर्माने वेढलेल्या केवळ आध्यात्मिकतेला बाजूला सारून, भौतिक प्रगती त्याज्य नाही हे सांगणाऱ्या, भौतिक प्रगती करून घेण्यासाठी बाजारात उतरलेल्या 'अर्थ-मानवा'चे (इकॉनॉमिक मॅन) विवेचन येते.

तेव्हा 'नैतिक भावनांचा सिद्धान्त' व 'राष्ट्रांची संपत्ती' या स्मिथ यांच्या दोन ग्रंथांत (विवेचनविषय भिन्न असल्याने) स्वहितासंबंधात काही टीकाकारांना जो विरोधाभास वाटतो, तो बरोबर नाही. नैतिक शक्तींना 'राष्ट्रांच्या संपत्ती'त कमी महत्त्व दिले गेले आहे, या टीकेत फारसे तथ्य नाही, असे जे. ए. शुम्पेटर[२] यांनी म्हटले आहे.

३

अर्थशास्त्राचा उदय होण्याआधी दोनशे वर्षांवर गणित व भौतिकी शास्त्रांत शास्त्रज्ञांचे प्रयोग चालू होते. त्याबद्दल लोकांना मोठे कुतूहल होते. हे शास्त्रज्ञ एकत्र जमत व आपापले ज्ञान पारखून घेत. कुतूहल असणाऱ्यांना ते स्पष्ट करून सांगत. त्यासाठी त्यांना पैशाचे साहाय्यही मिळे. विज्ञान असे प्रगत होत राहिले.

हे पाहून अर्थशास्त्रज्ञांनाही अर्थ-विज्ञान घडविण्याची सुरसुरी येत राहिली.

भौतिकीय (प्राकृतिक) रचनेचे जसे चिन्हांकन करून गणिताद्वारे मांडलेले अर्थवेत्त्यानी पाहिले, तसेच अर्थ-व्यवहारही कलन पद्धतीने (कॅलक्युलस) मांडण्याचा










त्यांचा प्रयत्न राहिला. भौतिकीय विज्ञानाच्या आधारे जशी यंत्रे तयार करता आली, उत्पादनाचे यांत्रिकीकरण करता आले, तसेच अर्थव्यवहारांची संरचना मांडण्याचा त्यांचा प्रयत्न राहिला. जॉन स्टुअर्ट मिल (१८०६-१८७३) यांच्या मते भौतिकी यामिकीचा (फिजिकल मेकॅनिक्स) अभ्यास करणाऱ्या शास्त्रज्ञांनी जसा 'गतीचा नियम' संशोधला, तसा संपत्तीच्या निर्मितीचे विज्ञान मिळविणाऱ्या अर्थवेत्त्यांनी आपले ज्ञान 'मानवी प्रकृतीच्या नियमानुसार' आधारिले पाहिजे.[३]

अर्थवेत्त्यांनी आपले विवेचन मांडताना भौतिक यामिनीने वापरलेल्या संज्ञा वापरल्या व कलनशास्त्राधारित प्रतिमाने उभी केली. वस्तुसेवा निर्माण करणारे अर्थ-मानव अशा रीतीने व्यवहार करतात, की जेणेकरून त्यांना सर्वाधिक लाभ व्हावा. कलनशास्त्रातील चलघटक (व्हेरिएबल्स), फलन (फंक्शन्स), सीमा (लिमिट्स), सातत्य (कंटिन्यूइटी), अनुजात (डेरिव्हेटिव्ह्ज) विकलन/विभेदी (डिफरेंशियल्स) इत्यादी संज्ञा अर्थमितीने[४] स्वीकारल्या आहेत. अर्थशास्त्र हे एक सामाजिक शास्त्र आहे. यात मानवी वर्तणुकीच्या एका अंगाचे, बाजारात वावरणाऱ्या अर्थमानवाच्या वर्तणुकीचे विश्लेषण येते. ही वर्तणूक भौतिक (सृष्टी) सारखी, घड्याळासारखी नियमित, यंत्रवत फिरत नसते, याचा आर्थिक विश्लेषणाचे विज्ञान घडविताना विसर पडला. प्रत्यक्षाशी असलेला त्याचा संबंध तुटला. एक बंदिस्त (मनोऱ्यातील) प्रतिमान निर्माण करण्यात अर्थतज्ज्ञ गुंतत गेले.

४

एकोणिसाव्या शतकात दोन गोष्टींचा प्रादुर्भाव झालेला दिसतो. वैचारिकतेत उदारमतवाद आला, तर (अर्थ-शास्त्रात) मूल्यनिदानात उपयोगिता – सीमान्त उपयोगिता – याचा वापर.

सीमान्त उपभोग हा चालू, उपलब्ध वस्तूंवर बेतलेला आहे; तंत्रज्ञानाच्या जादूगिरीमुळे निर्माण होऊ होणाऱ्या नवनव्या वस्तूंवर नाही. नवनव्या वस्तू आल्या, तर जाहिरातींद्वारा गिऱ्हाइकाला मोहात पाडावे लागते. स्त्रिया अशा मोहास चटकन बळी पडतात असे जे. के. गालब्रेथ म्हणतात.[५] (नवनव्या) उद्योगांच्या (वस्तूंच्या) स्त्रिया यासुद्धा दासी होत, असे त्यांचे प्रतिपादन आहे. तेव्हा चालू सीमान्त उपयोगितेवरूनच केवळ मागणी ठरत नाही. या बाजूनेही अर्थविज्ञानाने प्रत्यक्षाशी फारकत घेतलेली आहे.

५

अर्थशास्त्राच्या आजवरच्या विकासात, मला तरी (माझ्या मर्यादांसह) दोन प्रवाह स्पष्ट दिसतात. अभिजात-नवअभिजात व दुसरा केन्शियन–नवकेन्शियन. अभिजात-नवअभिजात विज्ञानाने नीतिमत्तेशी फारकत घेतलेली दिसते, तर केन्सने "अर्थशास्त्र हे मूलतः नीतिशास्त्र आहे; ते नैसर्गिक शास्त्र नव्हे. म्हणजे मूल्यांचा विवेक व आत्मपरीक्षण यांचा त्यात उपयोग करावा लागतो. प्रेरणा, अपेक्षा आणि मनोव्यापाराची अनिश्चितता यांचा ते विचार करते." असे प्रतिपादिले आहे. आपल्या सिद्धान्ताचा उपयोग आपल्यापुढील प्रश्न (उदा., बेकारी) सोडविण्याचे धोरण ठरविण्यात झाला पाहिजे, असे त्याने म्हटले आहे.[६]

अभिजात व नवअभिजात पंथाला मागणी-पुरवठ्याने (सीमान्त परिव्यय व सीमान्त उपयोगिता) वस्तुसेवांचे मूल्य ठरणाऱ्या बाजारात कसलाही (प्रामुख्याने सरकारचा-प्रशासनाचा) हस्तक्षेप, कसलेही नियंत्रण, देखरेख सहन होणारी नाही. बाजार खुला, मोकळा असायला हवा. ॲडम स्मिथ यांनी 'नैसर्गिक' मुक्तीचा ('नॅचरल' लिबर्टी) पुरस्कार केला आहे. म्हणजे न्यायसंस्थेने लादलेल्या निर्बंधा व्यतिरिक्त कोणतेही निर्बंध असता कामा नयेत. व्यक्तिव्यक्तींच्या परस्पर खुल्या व्यवहारांत कसलीही आडकाठी असता कामा नये. अर्थव्यवस्था अनिर्बंध असावी. व्यापार खुला ठेवावा. याची पुढची परिणती अशी, की सरकारशी अर्थशास्त्राचे (जणू) वैरत्व मानले जाऊ लागले.[७-८]

खुल्या बाजारात, मागणी-पुरवठ्याच्या घासाघिशीत ठरलेल्या किंमतीमुळे उत्पादन, उपभोग, विभाजन यांतून समतोल राहतो. हा समतोल एकाच वस्तूच्या बाजारात राहत नसून सर्व वस्तूंच्या बाजारात राहतो, हे लिओन वॉलरस (१८३४-१९१०) यांनी एकसमयावच्छेदी समीकरणाद्वारा दाखवून दिले आहे. शुम्पेटर यांनी वॉलरस यांचा 'एलेमेंट्स' हा ग्रंथ म्हणजे अर्थशास्त्राच्या मूलभूत सिद्धान्ताची सनद (मॅग्ना कार्टा) होय, असे वाखाणले






आहे.[९-१०] अर्थशास्त्राला विज्ञानाचे रूप देण्याची ही परमावधी म्हणावी लागेल. (अर्थात यात कालांतरात सुधारणा होत राहिली आहे.) अर्थविज्ञान असे प्रत्यक्षापासून फटकून निघत राहिले.

६

अभिजात व नवअभिजात अर्थशास्त्राचे दुसरे गृहीतक असे, की अर्थमानव, महत्तम स्वहित साधत असता (बाजारात) नेहमी तर्कसंगतपणे वागत असतो. याचे अगदी सोपे उदाहरण द्यावयाचे, तर मागणी कमी झाल्यास (व पुरवठा पूर्वीसारखा होत राहिला व अन्य गोष्टी बदलल्या नाहीत तर) अर्थमानव वस्तूंच्या किंमती कमी करतो. तर्कसंगत विचारात बाजारात प्रत्येक वस्तूला मागणी असते, बाजार (संध्याकाळी) पूर्ण रिकामा होतो, व या अनुभवाने, त्याच्या (उद्याबद्दलच्या) अपेक्षाही तर्कसंगतपणे ठरतात. याला 'तर्कसंगत अपेक्षांची परिकल्पना' (रॅशनल एक्सपेक्टेशन्स हायपॉथिसिस) असे म्हटले जाते. अलीकडची ही परिकल्पना आहे.

कालच्या व आजच्या व्यवहारावरून (अनुभवावरून) अर्थमानव उद्योगाबद्दलच्या अपेक्षा रेखीत राहतो. या तर्कसंगत अपेक्षा होत. उद्याबद्दलची संपूर्ण माहिती, उद्या कोणते बदल, कशा तऱ्हेचे बदल होणार, होऊ शकतील याची संपूर्ण माहिती आज मिळाल्यास त्यानुसार उद्यासंबंधीचे आडाखे आज बांधता येतात. ही संपूर्ण माहिती सर्वांना उपलब्ध असते व त्यानुसार अर्थमानव तत्काळ समायोजन करतो, असे आणखी एक गृहीतक नव-अभिजात अर्थतज्ज्ञ धरून चालतात. प्रत्यक्षाशी विसंगत असे हे गृहीतक आहे.

तर्कसंगत अपेक्षांच्या परिकल्पनेने नव-अभिजात अर्थतज्ज्ञांना असे सांगावयाचे आहे, की अर्थव्यवहारात सरकारच्या लुडबुडीची मुळीच आवश्यकता नाही. स्पर्धेमुळे, मागणी-पुरवठ्याच्या खुल्या देवघेवीमुळे, सीमान्त परिव्यय व सीमान्त उपयोगिता यांच्या छेदबिंदूपाशी भाव स्थिरावून सर्वत्र समतोलपणा येत असल्याने (समतोलपणाकडे अर्थव्यवस्था झुकत असल्याने, बाजारात कोणताही बिघाड येत नाही. अशा समतोल स्थितीत एकाला थोडे दुखविल्याशिवाय, काही कमी करावयास लावल्याशिवाय दुसऱ्यास अधिक सुखी करता येत नाही; जास्तीचे देता येत नाही. वस्तूंच्या किंमती, मजुरीचे दर, रोजगाराचे प्रमाण हे सारे बाजार ठरवितो. एक मजूर कामावर घेतल्याने उत्पादनात जी भर पडते, त्या भरीइतकी त्याची मजुरी ठरते. या मजुरीत काम करू इच्छिणाऱ्या सर्वांना काम मिळते. कमी मजुरीत काम नाकारणारे मजूर स्वखुषीने बेकार राहतात. काम व विश्रांती (आराम) यात ते विश्रांतीची निवड करतात.

हे सारे बिकट (गुंतागुंतीच्या) गणिताने, अर्थमितीने सिद्ध करता येते/केले जाते. नव-अभिजात अर्थतज्ज्ञांच्या अशा विचारसरणीत सक्तीने बेकार राहणाऱ्यांची चिंता नाही, कळवळा नाही.

उलट १९७० च्या दशकात अवरोधीवृद्धीची परिस्थिती असताना (तेलगंडांतरे, उत्पादनपुरवठ्यात अवरोध, मजूर संघटनांचा मजुरीवाढीसाठी हरताळ, भाववाढीच्या चढत्या अपेक्षा यांतून भाववृद्धी (इन्फ्लेशन) अशा परिस्थितीत बेकारीचा एक नैसर्गिक दर असतो (व ते प्रमाण कमी करण्याच्या भानगडीत कुणी पडू नये), असे प्रतिपादन नव-अभिजात अर्थवेत्ते मांडत होते. यातून पुढे १९८० च्या दशकात तर्कसंगत अपेक्षांचा सिद्धान्त व वास्तव व्यापारी चक्रांचा सिद्धान्त[११] (गृहितके) अशी दोन प्रतिपादने आली. तर्कसंगत अपेक्षां-बद्दल वर आले आहे.

७

अभिजात व नवअभिजात सिद्धांतन सगळी बेकारी खुशीची मानते. उलट, काम करू इच्छिणाऱ्या सर्वांना काम का मिळत नाही, याचे चिंतन केन्सने केले. प्रभावी मागणी तोकडी पडते, असे त्याचे विश्लेषण आहे.[१२] एकूण प्रभावी मागणीत दोन प्रकारांचा समावेश असतो. एक, उपभोग्य वस्तुसेवेसाठीची मागणी; दोन, उपभोग्य वस्तू निर्मिणाऱ्या यंत्रसामग्रीची – भांडवली मालासाठीची मागणी. उपभोग्य वस्तूंची मागणी ही प्राप्तीवर–प्राप्ती–रोजगारावर अवलंबून असते. ही मागणी बहुतांश स्थिर असते.

भांडवली मालाचे उत्पादन हे त्याच्या आयुष्यभराच्या अपेक्षित नफ्याच्या (परताव्याच्या) प्रमाणावरून (दरावरून) ठरते. अपेक्षा अशी, की चालू व्याजाच्या दराहून ते चढ असावे. अपेक्षित परतावा व्याजाच्या दराहून चढ

असला, तरच नवी गुंतवणूक करावीशी वाटते. गुंतवणुकीस प्रोत्साहन मिळते.

अपेक्षित नफा प्रत्यक्षात मिळेल की नाही, याची खात्री देता येत नाही. भावी काळातील परिस्थितीनुसार अपेक्षा बदलत राहतात. खासगी गुंतवणुकीत चढउतार होत राहतात. जेव्हा, खासगी गुंतवणूक घटते तेव्हा प्रभावी मागणी, रोजगार टिकवून ठेवण्यासाठी, समाजाने (सरकारने) गुंतवणूक केली पाहिजे, गुंतवणुकीचे सामाजिकीकरण केले पाहिजे, असे धोरण केन्सने पुरस्कारिले. बेकारी येऊ नये, लोकांची उपासमार होऊ नये, त्यांचा आत्मविश्वास डळमळू नये, त्यांना हतबलता येऊ नये, त्यांचे राहणीमान उंचावत राहावे, हा गुंतवणुकीच्या सामाजिकीकरणाचा हेतू आहे.

गुंतवणुकीत जोखीम व अनिश्चितता (परतावा भावी काळात मिळत असल्याने व भावी काळ कसा असेल याची खात्री नसल्याने) अनुस्यूत आहे. गुंतवणूकदार नवप्रवर्तक (आंत्रप्रिन्युअर) जोखीम घेण्याची एकीकडे धडाडी, पाशवी मुसंडी (ॲनिमल स्पिरिट)) हिंमत दाखवीत असतो; तर दुसरीकडे अनिश्चिततेस तोंड देण्यासाठी काही प्रमाणात रोकड बाळगण्याचा सावधपणा दाखवू शकतो. गुंतवणुकीचा, थोड्या काळात, पैसा व्हायला हवा व सावधानतेसाठी पैसा हवा, यातून उद्योजकाला पैशाचे प्रेम कधी व कसे निर्माण होते, हे त्याचे त्यालाही कळत नाही. पैशासाठी गुंतवणूक व अडकलेल्या गुंतवणुकीतून पैसा या चक्रात माणूस सापडलेला आहे. पैसा हे सुखसमाधान मिळविण्याचे साधन आहे; साध्य नव्हे, याचाच त्याला विसर पडला आहे. सुखसमाधान मिळविण्यासाठीची मनोवृत्ती व पैसा मिळवीत राहण्याची मनोवृत्ती यांत जमीनअस्मानाचे अंतर आहे. पैसा मिळविण्याची मनोवृत्ती जमिनीवर पाय रोवून राहते, तर सुखसमाधानकारी मनोवृत्ती अस्मानात तरंगत राहते. शेवटी सुखसमाधान मिळविण्यासाठी किती पैसा हवा, याचे उत्तर सापडत नाही. पण पैशाची हाव मात्र नकळत सुटलेली दिसते. उद्योग व काटकसर यांतून धनलोभ व हाव केव्हा परिवर्तित होतील, हे देवालाही समजलेले नाही. यावर व्यक्तीनेच आपल्यापुरत्या मर्यादा घालून घ्यायला हव्यात.

सर्वत्र सुबत्ता आली (आणि ती येणार यात शंका नव्हती), की आर्थिक प्रश्नांना गौण स्थान मिळण्याचे आणि त्याऐवजी जीवनाच्या व मानवी संबंधाच्या प्रश्नांना, सर्जनशीलता, वर्तन आणि धर्म (नीती) या मानवाच्या खऱ्या प्रश्नांना – हृदय आणि बुद्धीच्या क्षेत्रात प्रमुख स्थान मिळण्याचे दिवस फार दूर नाहीत असे केन्सला नेहमी वाटत राहिले.

पण अद्याप हे मृगजळ ठरत आले आहे!

## ८

१९५०-७३ हा भरभराटीचा काळ होता. दुसऱ्या महायुद्धानंतर (१९३४-४५) उद्ध्वस्त युरोपची मार्शल योजनेखाली पुनर्बांधणी, इंग्लंडमध्ये मजूरसरकारच्या प्रत्यक्ष गुंतवणुकीमुळे, केन्सच्या खटपटीमुळे स्थापन झालेली जागतिक बँक व आंतरराष्ट्रीय नाणेनिधीने पुरस्कारिलेले विदेशी चलन विनिमय दराची स्थिरता आणि डॉलरचे सोन्याशी निगडित स्थिर मूल्य या सर्वांमुळे हा काळ भरभराटीचा निघाला.

पण १९७३ नंतर आलेली दोन तेलगंडांतरे, १९७३-७८ मधील इराण-इराक युद्ध, अवरोधी-वृद्धीची (एकीकडे वाढती बेकारी तर दुसरीकडे चढती भाववृद्धीची) परिस्थिती या सर्वांमुळे अमेरिकेचा सोन्याचा साठा बराच कमी झाला, तेव्हा तिने सोन्याशी निगडित राखलेले डॉलरचे मूल्य झुगारून दिले व डॉलर तरता ठेवला.

एव्हाना केन्सच्या सिद्धान्तनाचा प्रभाव कमी होऊन नव-अभिजात अर्थ-सिद्धान्ताचा प्रभाव वाढला होता. त्या सिद्धान्ताच्या अभ्यासाने भारावलेले विद्यार्थी अमेरिकन विद्यापीठांतून बाहेर पडत होते. त्यांनी बृहत् निगमांचे-आंतरराष्ट्रीय नाणेनिधी व जागतिक बँक यांचे–व्यवस्थापन काबीज केले होते. या संस्थांनी, बृहन्निगमांनी जागतिकीकरण व शिथिलीकरणचा नारा लावला होता. वॉशिंग्टन-प्रणालीचा पुरस्कार, ती स्वीकारण्याचा अट्टहास सर्वत्र केला जात होता.

१९८० च्या दशकातील आर्थिक अडचणींचे खापर त्यांनी अर्थव्यवस्थेत सरकारी हस्तक्षेप, नियंत्रणे, पर्यवेक्षणे यांवर व निर्नियंत्रणाचा त्यांनी धोशा लावला. या सगळ्या कोलाहलात नीतिमत्ता पार धुळीला मिळाली.

९

व्यक्तींचे आदर्श, निगमांची कॉर्पोरेशन्स धोरणे पैसा मिळविणे, स्वतःची व कुटुंबांची संपत्ती वाढविणे, कोणत्याही प्रकाराने, साधनाने श्रीमंत होणे हाच आहे, अशी हवा सर्वत्र पसरली व ती अद्याप टिकून आहे. खुल्या बाजाराचे कट्टे पुरस्कर्ते मिल्टन फ्रीडमन या नोबेल पारितोषिक मिळविणाऱ्या अर्थशास्त्रज्ञांनी उद्योगांची, निगमांची एकच आणि एकमेव सामाजिक जबाबदारी आहे; ती म्हणजे स्वतःची संसाधने व व्यवहार नफा मिळविण्यासाठी योजले पाहिजेत, असे तीस वर्षांपूर्वीच सांगून ठेवले होते.[१३]

परिणामी आर्थिक घोटाळे, निगमांच्या प्रतिष्ठेची धुळवड, त्यांच्या अजबाबदारपणात वाढ दृष्टोत्पत्तीस येऊ लागली. या वृत्तीत हळूहळू बदल होताना दिसत आहे. निगमांच्या सामाजिक जबाबदारपणाची चर्चा सुरू झालेली आहे. तिचे विवेचन यापुढे करू.

१०

गेल्या वीस-पंचवीस वर्षांत पाश्चिमात्य देशात दोन प्रकारचे प्रवाह वाहताना दिसतात. एक कशाही प्रकारे पैसा मिळविण्याचा. त्यात समाजाची कसलीही जबाबदारी पतकरण्याचे बंधन आपल्यावर नाही असे सांगणारा. हा प्रवाह अद्याप जोराने उसळी मारत खळाळत चालला आहे.

दुसरा प्रवाह आपल्या व्यवहारात काही नैतिक मूल्ये सांभाळली पाहिजेत, असे मानणारा. या प्रवाहाचा ओहोळ नदीच्या उगमासारखा, प्रथम सौम्य स्वरूपाचा पण संथपणे विस्तारत चालला आहे.

याची तीन कारणे सांगितली गेली आहेत. एक, केलेले करार पाळले नाहीत, उल्लंघले, त्यांना मुरड घातली, तर होणारे कोर्टात उभे राहण्याचे, नाचक्की होण्याचे प्रसंग टाळणे. दोन, स्वतःच्या उद्योगाचे प्रतीक, जे त्याच्या मालाच्या गुणवत्तेसाठी, टिकाऊपणासाठी, सुबकपणासाठी लोकमानसात व गिऱ्हाइकांत महशूर आहे त्याला तडा जाता कामा नये. तीन, अलीकडे, कंपन्यांचे, निगमांचे भागधारक जागृत झाले असून ते निगमांच्या वार्षिक सभेत हिरिरीने भाग घ्यायला लागले आहेत. कंपनीने नैतिकता उल्लंघिल्यास त्याबद्दल ते जाब विचारायला लागले आहेत. या आरोपांचे परिणाम म्हणून तत्काळ या कंपन्यांच्या शेअर्सचे भाव खाली आल्याचे दिसू लागले आहे. ते टाळायला हवे, अशी कंपन्यांची मनोधारणा बनली आहे.

अनैतिकतेचे, कंपन्यांनी सामाजिक जबाबदारी टाळल्याचे दुष्परिणाम अनुभवास आलेले आहेत. भारतीयांनाही अनुभवास आलेले एन्रॉनचे उदाहरण, २००७-०८ मधील लेहमन ब्रदर्सची दिवाळखोरी, बँकांनी दिलेल्या गृहगहाण कर्जखतांचे शेअर्स करून शेअरबाजारात विकण्याची अभिनव क्लृप्ती ही त्याची ठळक उदाहरणे आहेत.

१९९५ चे शेल खा तेल कंपनीचे उदाहरण असेच नमूद करण्याजोगे आहे. नॉर्थ सी मधील ब्रेंट स्पार तेल-खाण विकण्याचा तिचा प्रयत्न नैतिकतेला धरून नव्हता आणि केन सारो-विवा या मानवाधिकार जपणाऱ्या सामाजिक कार्यकर्त्याला फाशी देण्याच्या नायजेरियन सरकारच्या हुकमास तिने विरोध केला नाही, असे दोन ठपके तिच्यावर आहेत. तसेच निके या कंपनीचा एक पुरवठादार लहान मुलांना कामाला लावतो आहे, अशी जहरी टीका या कंपनीवर झाली आहे.[१४]

११

तेव्हा कंपनीची प्रतिष्ठा, तिच्या ब्रँडचा नावलौकिक व भागधारकांना, पुरवठा करणाऱ्यांना व गिऱ्हाइकांना सांभाळून ठेवण्यासाठी तरी कंपनीने सामाजिक जबाबदारीने, नैतिकतेने वागले पाहिजे, या विचाराने पाय रोवायला सुरुवात केली आहे. एवढेच नव्हे तर, अमेरिकेत १९९२ साली "नैतिकता व नियमानुसार वर्तन करणाऱ्या अधि-काऱ्यांचा संघ" (एथिक्स अँड कॉम्प्लायन्स ऑफिसर्स असोसिएशन) नावाची संस्थाही स्थापन करण्यात आली आहे.[१५] प्रत्येक उद्योगातर्फे आपल्या संस्थेत नैतिकता पाळली जाते आहे की नाही, उद्योगाचीं मूल्ये, हेतू सांभाळले जात आहेत की नाहीत, तसेच सचोटी, सहकार, गुप्तता राखली जात आहे की नाही, हे पाहण्यासाठी एक अधिकारी नेमला जात आहे. किंवा हे कार्य एका अधिकाऱ्याकडे सोपविले जात आहे. अशा अधिकाऱ्यांना या संघाचे सभासद करून घेतले जाते. सुरुवातीस अगदी मोजके सभासद होते. २००१ मध्ये ७०० (मोठ्या

उद्योगांच्या संख्येच्या २० टक्के), तर २००६ साली ही संख्या १२५० हून अधिक होती. यात १६० देशांतील १०० फॉर्च्यून कंपन्यांच्या पन्नासहून अधिक कंपन्या सभासद होत्या.

या संघाचे काही उद्देश (संदेश), दृष्टी व मूल्ये आहेत. व्यवस्थापनात नैतिकता पाळली जाईलशी आच आहे. कठीण प्रसंगात योग्य तो नैतिक मार्ग अधिकाऱ्यांनी अनुसरावा, अशी तळमळ संघाने बाळगली आहे.

**१२**

पण योग्य नैतिक मार्ग कोणता, हे सरसकट ठरविणे कठीण आहे. प्रसंग कोणता व पेच कोणता यावरून ते ठरवावे लागेल. 'द इकॉनॉमिस्ट'ने नमूद केलेली काही उदाहरणे देतो.

एका रहिवासी इमारतीस आग लागली. वरच्या मजल्यावर चाळीस भाडेकरू राहत होते. तिथे आग पोचायच्या आधी त्यांची सुटका करणे अगत्याचे होते. जॉन स्लेटर या पोलीस सुपरिंटेंडंटने लगेच एका अधिकाऱ्यास त्यांची सुखरूप सुटका करण्यास वर पाठविले.

एवढ्यात एका दारामागून 'मला वाचवा, मला वाचवा' असा आक्रोश त्याला ऐकू आला. त्याने हातात हातमोजे घालून धाव घेतली. खोलीचे हँडल तापले होते. त्याचा चटका त्याला बसला. खोलीचा रंग वितळत खाली येत होता. त्याने दार उघडले असते, तर आगीचा लोळ वरती गेला असता. म्हणून त्याने वरील सर्व भाडेकरूंची सुटका होईपर्यंत काही केले नाही. वरील सर्वांची सुटका झालेली पाहून त्याने खोलीचे दार उघडले तर आतील माणूस मरून पडला होता. पोलीस सुपरिंटेंडंटपुढे ही शृंगापत्ती होती. आगीमुळे त्याला मरू देणे नैतिक दृष्ट्या योग्य होते का?[१६-१७] हा प्रश्न ४० लोकांचे प्राण वाचवून सोडविला.

जॉन लेविस नावाची इंग्लंडमधील किरकोळ विक्री करणाऱ्या दुकानांची साखळी. तिने विविध वस्तू भांडार हे दुकान बंद करण्याचे ठरविले. (बंद करण्याचे कारण दिलेले नाही.) या भांडाराचे स्थापनेपासूनचे तत्त्व हे होते, की कामगार हे भागीदार होत. त्याचे गिऱ्हाईक, पुरवठादार आणि स्थानिक लोक व पर्यावरण यावर ते भांडार बंद केल्यास प्रतिकूल परिणाम होणारा होता.

तेव्हा भागीदारांचे व भांडारावर अवलंबून असणाऱ्यांचे हित सांभाळण्यासाठी, केवळ नुकसानीकडे न पाहता, जवळच्याच विभागत ते हलविले गेले.[१८]

मार्क विल्किन्सन हा एका लाकडी फर्निचर तयार करणाऱ्या एका खासगी कंपनीचा अध्यक्ष. तो सांगतो :

"फर्निचरच्या प्रत्येक गिऱ्हाइकामागे आम्ही एक झाडाचे रोपटे लावतो. आम्ही टिकाऊ कच्चा मालच वापरतो. शाळकरी मुलांना, तसेच पन्नास वर्षांवरील वयस्करांना आमच्या झाडे लावण्याच्या उद्योगात उमेदवार म्हणून आम्ही सामावून घेतो. आम्ही फ्रँकिंग मशीन वापरीत नाही. कारण त्यामुळे स्थानिक पोस्ट ऑफिस चालू ठेवता येते व लोकांची सुविधा राखता येते." अशा प्रकारे पर्यावरणाची व स्थानिक लोकांची काळजी विल्किन्सन याच्या लाकडी फर्निचर करण्याच्या उद्योगाने आपली नैतिक जबाबदारी सांभाळलेली आहे.

**१३**

"नैतिकता व नियमानुसार वर्तन यासंबंधात प्रत्यक्ष पाहण्याही झालेल्या आहेत. त्या पाहण्यांचा थोडक्यात सारांश असा :

- उद्योगाने आपले ध्येय-धोरण, मूल्ये ठरविली पाहिजेत व त्यांस अनुसरून कर्मचाऱ्यांनी पाळावयाचे नैतिकतेचे नियम तयार करावयास हवेत व ते संचालकानी व कर्मचाऱ्यांनी काटेकोरपणे पाळायला हवेत.
- कायद्यांचे व नियमांचे उल्लंघन होता कामा नये.
- कर्मचाऱ्यांना न्याय्य वागणूक मिळाली पाहिजे. त्यांना विश्वासात घेऊन उद्योग चालविला पाहिजे.
- नीतिपूर्वक वागणे हा स्वभाव बनला पाहिजे. संचालक आणि कर्मचारी यांनी 'बोले तैसा चाले', अशी वृत्ती अंगीकारायला हवी.
- कर्मचारी नैतिकता पाळतात की नाही, हे पाहणारी खास दूरध्वनी मार्गाद्वारा (हॉटलाइन) सोय निर्माण करायला हवी व चुकणाऱ्यांना समज द्यायला हवी; शिक्षा करायला हवी
- जे नैतिकतेने वागतात, त्यांचे कौतुक (प्रशंसा) व्हायला हवी.

नैतिकता पाळण्याचे शिक्षण/प्रशिक्षण, संस्कार लहानपणापासूनच व्हायला हवेत.










उद्योगांच्या संचालकांची, कर्मचाऱ्यांची, व्यक्तींची विश्वासार्हता, प्रामाणिकपणा व जबाबदारी निर्माण करण्याचा हा एक मार्ग दिसतो.

**टिपा :–**

१. आयर्विंग क्रिस्टोल (१९८१) पृ. २०६.
२. जे. ए. शुम्पेटर (१९५४), पृ. १८२.
३. ज्यूलिया नेल्सन (२००६) पृ. १९ येथे उद्धृत.
४. दुसऱ्या महायुद्धाच्या सुरुवातीला (१९४१-४२) ब्रिटिश सरकारचे त्या वेळचे सल्लागार जॉन पेनार्ड केन्स यांनी 'राष्ट्रीय साधनसंपत्तीचे अंदाजपत्रक' नावाचा लेख तयार केला होता. त्यावर अमेरिकेतील ब्रुकिंग इन्स्टिट्यूटने 'राष्ट्रीय उत्पन्नाचे हिशेब' मांडायला सुरुवात केली. (१९६५) त्यासाठी प्रथम, श्रमशक्ती, उपभोक्त्यांची मागणी अशा १८ घटकांच्या व ३० उत्पादक क्षेत्रांच्या ३०० समीकरणांच्या द्वारा हे हिशेब मांडले होते. पुढे त्यांची (संख्या) वाढत गेली.
५. खेर (१९९९), पृ. ३२.
६. खेर (१९९७), पृ. ३६.
७. रॉबर्ट स्किडेलस्की (२०१०), पृ. ३३.
८. २००७-०८ चे वित्तीय अरिष्ट, सरकारचे/मध्यवर्ती बँकेचे कसलेच नियमन नसल्याने, बँकांनी त्यांनी दिलेल्या कर्जांचे रोखे करून विकण्याची मनमानी केल्याने उद्‌भवले, हा ताजा इतिहास आहे.
९. डॅनिएल बेल व आर्यविन क्रिस्टोल (सं. १९८१) पृ. ५२ येथून उद्धृत.
१०. पॉल सॅम्युएलसन यांच्या मते ॲडम स्मिथ, वॉलरास आणि केन्स असे तीन श्रेष्ठ अर्थशास्त्रज्ञ होत. (रॉबर्ट स्विडेलस्की, (२०१०), पृ. ३१.)
११. याच्या सविस्तर विवेचनासाठी पहा खेर (२००४), पृ. ४८.
१२. केन्सने प्रामुख्याने विकसित देशातील या प्रश्नाचा विचार केला. इथे उत्पादन/पुरवठा यंत्रणा सज्ज होती. पण मागणी, लोकांची क्रयशक्ती कमी पडल्याने ती थंड पडली होती.
विकसनशील देशांत उत्पादनयंत्रणा निर्माण करण्याची आवश्यकता असते.
१३. द इकॉनॉमिस्ट (२००८) पृ. १ येथे उद्धृत.
१४. ही उदाहरणे द इकॉनॉमिस्टच्या बिझिनेस एथिक्स या पुस्तकात नमूद आहेत. पृ. १.
१५. गुगलवरून.
१६. उपरोक्त पृ. २२.
१७. डिसेंबर १९९९ सालात असाच नैतिक प्रश्न भारत सरकारपुढे उभा होता. त्या वेळी पाकिस्तानी दहशतवाद्यांनी विमान अडकविले होते. त्यात १६० प्रवासी होते, व त्यांच्या जीविताला धोका होता. तेव्हा सरकारने, परराष्ट्रीय मंत्र्यांना सोबत पाठवून या दहशतवाद्यांना कंदहारला सुखरूप पोचवून प्रवाशांची सुटका केली होती. हे योग्य होते का नव्हते, हा नैतिक प्रश्न अद्याप चर्चेत राहिला आहे.
१८. उपरोक्त पृ. २३.
१९. उपरोक्त पृ. २५.

**संदर्भ :–**

1. Irving Kristol (1981) : "Rationalism in Economics", in "The Crises in Economic Theory (Eds.)" Daniel Bell and Irving Kristol] Basil Books, New York.
2. J. A. Schumpeter (1954) : History of Economic Analysis, Oxford University Press, New York.
3. Julia A Nelson (2006) : Economics for Humans, University of Chicago Press, Chicago.
4. Bobert Skidelsky (2010) : Keynes, The Return of the Master, Penguin Books, London.
5. The Economist (Edited) (2008) : Business Ethics.



# शेतीप्रधान देशात शेतीचीच उपेक्षा

श्री. प्रभाकर कुलकर्णी

माणसांनी जगले पाहिजे व त्यासाठी अन्नाची गरज आहे. अगदी प्राथमिक अवस्थेतही माणूस कंदमुळे खाऊन जगत होता. पशुपक्ष्यांची शिकार करून खाणे हाही आदिमानवाचा नित्यक्रम होता. याचा अर्थ वाघसिंहासारखे हिंस्र पशू आणि माणूस यांच्यात त्या काळात फरक नव्हता. माणूस विचार करू लागला आणि खाण्यासाठी पर्याय शोधू लागला, त्या वेळी त्याला प्रयोग करण्याची कल्पना सुचली आणि शेतीच्या पेरणी-उगवणीच्या आणि उत्पादनाच्या प्रक्रियेला सुरुवात झाली. या प्रगतिशील वाटचालीनंतर पिकांची निवड करणे, खाण्यासाठी विविध प्रकारची पिके घेणे आणि त्या शेतीपिकांचे खाण्यासाठी चवदार पदार्थ तयार करणे, ही प्रक्रिया सुरू झाली. शेतीमालावर प्रक्रिया करून त्यापासूनही खाण्याचे पदार्थ तयार करणे व या प्रक्रियांसाठी पुन्हा शेतीउत्पादन वाढविणे, असे चक्र सुरू झाले आणि मानवी उत्क्रांतीच्या प्राथमिक अवस्थेतून सुरू झालेलीही प्रक्रिया आता प्रगत अवस्थेत चालू आहे. कारण शेती हाच जगण्याचा मूलाधार आहे. भारतासारख्या शेतीप्रधान देशाचे हे वास्तव व शेतीचे मूलभूत महत्त्व समजून घेतले पाहिजे.

शेतीमालाचे उत्पादन आवश्यक आहे व त्यासाठी शेती केली पाहिजे, ही संकल्पना चांगली कार्यवाहीत आल्यानंतर शेतीच्या आणि माणसांच्याही गरजा वाढू लागल्या. शेतीसाठी अवजारे पाहिजेत, पाणी खेचण्यासाठी यंत्रे पाहिजेत, अशा गरजा लक्षात आल्या आणि त्या शेतीउपयोगी साधनांसाठी उद्योग निर्माण झाले. माणूस कल्पकतेने उद्योग सुरू करू लागला; पण त्याची मूळ प्रेरणा शेती हीच होती. शेतीतून उद्योगांची बीजे रोवली गेली, हे वास्तव उद्योगाकडे झुकणाऱ्या अर्थव्यवस्थेने समजून घेतले पाहिजे. माणसांच्या इतर गरजा निर्माण झाल्या व त्यातून कापडाची निर्मितीप्रक्रिया सुरू झाली व कापूस हा शेतीमालच त्यासाठी आवश्यक झाला. माणसांच्या गरजा जशा वाढत गेल्या, त्याप्रमाणे या गरजांचा विचार करून माणसाने विविध उद्योग सुरू केले. अन्नधान्यांपासून प्रक्रिया करण्याचे उद्योगही सुरू झाले. सौंदर्यप्रसाधने, टुथ ब्रश, टुथ पेस्ट, औषधे, दूध प्रक्रिया उद्योग, बेकरी उत्पादने, दूरध्वनी यंत्रे, मोबाईल फोन, छपाई यंत्रे अशी विविध उत्पादने करणाऱ्या लहान-मोठ्या कंपन्या तयार झाल्या. पण या सर्व प्रक्रियेत माणसाच्या अन्नाची गरज व त्यासाठी शेतीमालाचे उत्पादन कायम राहिले आहे हे विशेष.

माणसांच्या विविध गरजा हेरून मोठे उद्योग आणि आलिशान कंपन्या यांचे 'कॉर्पोरेट क्षेत्र' निर्माण झाले. या 'कॉर्पोरेट क्षेत्रा'ची औद्योगिक कार्यक्षमता, व्यवस्थापकीय कौशल्य, धोरण ठरविणाऱ्या राजकीय, प्रशासकीय व आर्थिक संस्थांशी सलोख्याचे संबंध राखण्याची व्यवस्था, त्यासाठी निर्माण झालेली खास जनसंपर्क यंत्रणा अशा सर्व माध्यमांतून हे क्षेत्र विकसित झाले, संपन्न झाले आणि त्याच्या यशाचे नगारे देशाच्या आणि जगाच्या नकाशावर वाजू लागले. संपन्न उद्योगपतींची नावे आणि छायाचित्रे देशी आणि विदेशी प्रसारमाध्यमांतून झळकू लागली. या सर्व झगमगाटाचा प्रभाव राजकीय आणि आर्थिक व्यवस्थेवर इतका निर्माण झाला की, राजकीय आणि आर्थिक निर्णय या 'कार्पोरेट क्षेत्रा'चे हितसंबंध जपण्यासाठी घेतले जाऊ लागले. पण या सर्व उद्योगक्षेत्रांत गुंतलेले उद्योगपती, अधिकारी, कर्मचारी, कामगार आणि त्यांच्यावर अवलंबून असणारी असंख्य कुटुंबे यांची अन्नाची गरज कायम राहिली. अन्नधान्याची आणि इतर आवश्यक शेतमालाची गरज कायम राहिली. याचा अर्थ शेतीशिवाय उद्योग अशक्य आहे, ही वस्तुस्थिती आहे.

उद्योग कितीही वाढले आणि 'कॉर्पोरेट क्षेत्रा'ची प्रतिभा आणि प्रभाव कितीही परिणामकारक असला, तरी 'शेतीक्षेत्र' हा जीवनाचा मूळ आधार आहे. शेतीक्षेत्राच्या सर्वांगीण विकासासाठी या क्षेत्राला झुकते माप दिले पाहिजे. कार्पोरेट क्षेत्राचा एवढा प्रभाव आहे की,








अंदाजपत्रक निश्चित करण्यासाठी सत्तारूढ सरकारचे मंत्री उद्योगपतींना चर्चेसाठी बोलावितात. उद्योगक्षेत्रातील संघटना अशा चर्चेची वाटच पाहत असतात आणि चर्चेत आपल्या मागण्या, अडचणी, अपेक्षा आणि संभाव्य सवलती यांचा तपशील धोरण ठरविणाऱ्या सरकारला सादर करतात. नंतरच्या जाहीर अंदाजपत्रकात 'कॉर्पोरेट क्षेत्रा'ला करआकारणीत दिलेली सूट, सवलत व इतर अपेक्षांना संमती मिळाल्याचे चित्र दिसते. या तुलनेने शेतीक्षेत्राची स्थिती काय आहे? शेतीक्षेत्रात परिपूर्ण संघटन नाही. राज्याराज्यांत अलीकडे शेतकरीसंघटना स्थापन झाल्या आहेत. पण राज्य सरकारे आणि केंद्र सरकार या संघटनाना अंदाजपत्रकापूर्वी चर्चेसाठी नियंत्रण देत नाही. शेतीक्षेत्राच्या नेमक्या मागण्या व अपेक्षा काय आहेत, याचा वेध घेऊन रास्त प्रतिसाद देण्यासाठी सरकारी पातळीवर उदासीनता दिसते.

**नगराप्रमाणे शेतीक्षेत्रही वाढले पाहिजे.**

आदिमानवाच्या जगण्याच्या शैलीत जशी प्रगती झाली आणि शेती करून खाण्यासाठी अन्नधान्य पिकविण्यास सुरुवात झाली, त्या वेळी शेतीमालाच्या बदल्यात इतर वस्तू आणि सेवा मिळू लागल्या. बारा बलुतेदार पद्धती रूढ झाली. शेतात पिकणारे धान्य द्यावे व त्या बदल्यात इतर बलुतेदारांची सेवा आणि साधने घ्यावीत, असा व्यवहार सुरू झाला. परिणामी, शेतीमालाला चलनाचे अगर पैशाचे महत्त्व आले. पैसा आजच्या जीवनात जेवढा महत्त्वाचा, तेवढेच मोल आणि महत्त्व शेतीमालाला होते. हे महत्त्व आता कमी करण्याचे प्रयत्न होत आहेत. शेतीपेक्षा उद्योग-व्यवसायांना महत्त्व असे आज समीकरण होऊ पाहत आहे. नागरी भागात आणि प्रगत आलिशान सुखसोयीत राहणारे विचारवंत भावी काळात शहरे वाढणार आणि खेड्यांतून स्थलांतर होत गावाचे महत्त्व कमी होणार, असा प्रचार करीत आहेत. पण नगरे आणि महानगरे वाढली आणि स्थलांतरामुळे गावे ओस पडू लागली, तर शेती कशी आणि कोण जोपासणार? मग नगरवासियांना भुकेच्या वेळी अन्न कोण देणार? त्यासाठी धान्य कोठून आणणार? हे प्रश्न भेडसावत राहतील.

केवळ प्रगत आणि आलिशान शहरे निर्माण करण्याचा प्रयत्न झाला, तर अनेक संकटे येत राहतील. आपल्या देशात पडसर, ओसाड व पिकाखाली न आणलेले क्षेत्र फार आहे. शेतीक्षेत्राच्या तुलनेने पडीक आणि ओसाड जमिनीचे प्रमाण जास्त आहे. कोणत्याही रस्त्यावरून जाताना शहरांची हद्द ओलांडल्यावर अशा ओसाड जमिनी जागोजागी दिसतात. त्या जमिनी पाहिल्यावर नागरी जीवनाचे आकर्षण असणाऱ्यांना या ठिकाणी आणखी एखादे चांगले नगर, उपनगर उभे करावे, तेथे सुखसोयी पुरवण्यात याव्यात अशी प्रबळ इच्छा होणे साहजिक आहे (लावासा हे याचे उदाहरण). पण ही प्रवृत्ती आणि अशी इच्छा आणि त्याप्रमाणे केली जाणारी कृती शहरे आणि खेडी अगर शेतीक्षेत्र यांच्यात अनिष्ट असमतोल निर्माण करणारी आहे. उलट, अशा ओसाड जमिनीचे पिकाऊ जमिनीत रूपांतर करण्याचा मोह झाला, तर तो भावी जीवनात समतोल निर्माण करणारा होईल. कारण भारतीय शेतीमालाला, फळांना देशात आणि परदेशांत मागणी आहे. ही मागणी पुरविण्यासाठी शेतीक्षेत्र वाढले पाहिजे.

**उद्योगक्षेत्राच्या प्रभावामुळे शेतीची उपेक्षा**

शेतीमालाचे महत्त्व हे जगण्याचा आधार या दृष्टीने मूलभूत आणि चिरंतन आहे. उद्योग वाढले, रोजगार मिळू लागला आणि शहरांचा विकास होऊन खेड्यांतून शहरांकडे स्थलांतर होत राहिले, तर शेती उपेक्षित राहील. आज थोड्याफार प्रमाणात ही स्थिती आहे. कारण शेतीक्षेत्र एका बाजूला संघटित नाही, या क्षेत्राचा प्रभाव सरकारी धोरणावर पडावा या दृष्टीने शेतकऱ्यांची समर्थ 'लॉबी' नाही. इतर उद्योगांचे संघटन आहे. बड्या औद्योगिक कंपन्यांचे 'कॉर्पोरेट क्षेत्र' इतके समर्थ आहे की, सरकारच्या निर्णयप्रक्रियेवर त्यांचा प्रभाव आहे. या संदर्भातील नीरा राडिया या महिलेने राजकीय नेते, इंग्रजी महिला-पुरुष पत्रकार यांच्याशी केलेल्या गुप्त संभाषणाच्या ध्वनीफिती काही इंग्रजी साप्ताहिकांनी प्रसिद्ध केल्या व त्यामुळे या 'कॉर्पोरेट क्षेत्रा'त एकच खळबळ उडाली. नीरा राडिया ही प्रभावी व्यक्तिमत्त्व असलेली महिला उद्योगपती टाटा आणि अंबानी या दोघांच्याही हितसंबंधांचे रक्षण करण्याचे काम करते. या राडियाने सत्तारूढ काँग्रेस राज्यकर्त्यांना दळणवळण मंत्री ए. राजा यालाच मंत्री करावे यासाठी प्रभाव टाकल्याचे उघड झाले आहे. राज्यकर्त्या पक्षावर

प्रभाव टाकून आर्थिक धोरणे कशी असावीत, त्यासाठी मंत्री कोणाला नेमावे व त्यांनी कोणते निर्णय करावेत यासाठी प्रभावी महिलांच्या माध्यमातून सरकारला स्वतःच्या हितसंबंधांचे रक्षण करण्यासाठी प्रवृत्त करण्याचे काम हे उद्योगांचे 'कॉर्पोरेट' क्षेत्र फार पूर्वीपासून करीत आहे. देशाची आर्थिक व्यवस्था सतत आपल्याला अनुकूल असावी यासाठी या व्यवस्थेवर नियंत्रण ठेवणारी 'रिझर्व्ह बँक' कशी असावी, त्यावर संचालक कोण असावेत, हे या कॉर्पोरेट क्षेत्राच्या प्रभावामुळेच ठरले आहे.

**रेल्वेप्रमाणे शेतीसाठी स्वतंत्र अंदाजपत्रक पाहिजे**

शेतीक्षेत्राचे व्यापक महत्त्व व शेती हा जीवनाचा मूलाधार हे आता सर्वमान्य झाल्यामुळे आगामी अंदाजपत्रकात शेतीक्षेत्रासाठी स्वतंत्र विचार होणे आवश्यक आहे. नवीन वर्षातील जानेवारी व फेब्रुवारी हे महिने अंदाजपत्रकांच्या दृष्टीने महत्त्वाचे आहेत. उद्योगक्षेत्रातील बडे उद्योग व त्यांच्या संस्था यांना केंद्रीय अर्थमंत्री अंदाजपत्रकापूर्वी चर्चेसाठी बोलावितात. त्यांच्या अपेक्षा आणि मागण्या समजून घेतात. पण शेतीक्षेत्राला हा सन्मान दिला जात नाही. सरकारी पातळीवर शेतीक्षेत्र किती उपेक्षित आहे, याचे हे उदाहरण आहे. पण आता देशातील आणि राज्यांतील शेती संघटनांनी मेळावे भरवून शेतीक्षेत्रासाठी स्वतंत्र अंदाजपत्रकाची मागणी केली आहे.

शेतीतील उत्पादनाचे महत्त्व एका अर्थाने जागतिक आहे. शेतीमाल स्वदेशातील ग्राहकांना पुरविला जातो. त्याचप्रमाणे या मालाची निर्यातही होते. जागतिक बाजारपेठेत मागणी वाढली, की दरही चांगले मिळतात. शेतीचे एवढे महत्त्व असूनही हा विषय राज्य सरकारांच्या कक्षेत आहे. शेतीसाठी केंद्र सरकारने पैसा पुरविला, तरी विनियोग करण्याची जबाबदारी राज्य सरकारची आहे. परिणामी अंदाजपत्रकात शेतीसाठी केलेली आर्थिक तरतूद राज्य सरकारने उपयोगात आणावयाची आहे, असे गृहीत धरून राज्य सरकारच्या शेतीविषयक व्यवहारावर केंद्र सरकारचे वैधानिक नियंत्रण नसते. ते असले पाहिजे व त्यासाठी शेती हा विषय राज्य आणि केंद्र या दोघांच्याही नियंत्रणात येणे आवश्यक आहे. शेतीसाठी स्वतंत्र अंदाजपत्रकाची मागणी करताना सर्वपक्षीय खासदारांनी याही मागणीचा पाठपुरावा केला पाहिजे.

**शेतीक्षेत्रांतील उद्योगांचा उद्योगक्षेत्रांत समावेश करावा**

शेतीचे स्वतंत्र अंदाजपत्रक तयार करताना शेतीक्षेत्रातील उद्योगांचा स्वतंत्र विचार करणे आवश्यक आहे. उदाहरणार्थ, साखर कारखाने, पोल्ट्री व्यवसाय यांसारख्या उद्योगांना शेतीसाठी राखीव कोट्यातून भरीव रक्कम दिली जाते व बँका ही सर्व रक्कम शेतीसाठीची रक्कम दाखवून आपण शेतीसाठी किती भरघोस अर्थपुरवठा केला आहे, याची जाहिरात करीत असतात. शेतीसाठी १०० कोटींची तरतूद असेल, तर साखर कारखान्यांना व इतर शेती-आधारित मोठ्या उद्योगांना ९० कोटी दिले जातात व प्रत्यक्ष शेती करणाऱ्या शेतकऱ्यांना मात्र फक्त १० कोटीच शिल्लक राहतात. बँका मात्र प्रचार करतात की, आपण शेतीला १०० कोटी दिले आहेत. शेतकऱ्यांना मात्र गरजेनुसार बँका पैसे देत नाहीत व त्यांना पर्यायी व्यवस्था करावी लागते. साखर कारखान्यांना एकावेळी निरनिराळ्या बँका काही कोटी रूपये देतात, पण त्याच कारखान्याच्या सभासदांना एक बँक पुरेसा पतपुरवठा करीत नाही. परिणामी कारखाना समर्थ, पण मालक-सभासद संकटात अशी स्थिती होते.

शेतीक्षेत्रातील जे उद्योग आहेत, त्यांचे सर्व व्यवहार आणि त्यांना मिळणारे सर्व फायदे उद्योगक्षेत्राप्रमाणे मिळत असल्यामुळे त्यांचा समावेश उद्योगक्षेत्रात करावयास हरकत नाही. त्यामुळे उद्योगक्षेत्रासाठी प्रतिवर्षी अंदाजपत्रकात ज्या अमाप सवलती मिळतात, त्या त्यांनाही मिळत राहतील. एका कारखान्याने अनेक राष्ट्रीयीकृत बँकांकडून कर्जे घेण्याची सवलत उद्योगक्षेत्रांत आहे व तीच सवलत सहकारी व खासगी साखर कारखान्यांनाही मिळत आहे. याचा अर्थ साखर कारखान्यांचा समावेश उद्योगक्षेत्रात केला तर शेतीला अंदाजपत्रकात राखीव ठेवलेली रक्कम गरजू शेतकऱ्यांना देणे बँकांना बंधनकारक राहील व साखर कारखान्यांना उद्योगांना मिळणाऱ्या सर्व सवलती मिळत असल्यामुळे त्यांना अधिकाधिक फायदा व सवलती मिळतील. शेतकऱ्यांना शेतीसाठी राखीव ठेवलेली रक्कम पूर्णपणे मिळेल आणि गरजेनुसार रक्कम मिळत राहिल्यामुळे खासगी सावकाराकडे जाण्याची पाळी येणार नाही. अर्थात यासाठी बँकांनीही

आपली मानसिकता बदलली पाहिजे.

**शेतीक्षेत्राला बँकांचा नकारात्मक प्रतिसाद**

देशाची अर्थव्यवस्था शेतीक्षेत्राला अनुकूल, सवलतीचा आणि पुरेसा पतपुरवठा करणारी असली पाहिजे. कारण शेतीक्षेत्र हे देशाला आणि जगालाही अन्नधान्य व इतर शेतीमालाचा पुरवठा करीत असते. शेतीमालाचा आधार असेल तर नगरे, महानगरे आणि कॉर्पोरेट क्षेत्रातील बडी मंडळी यांच्या अन्नाच्या गरजा भागणार आहेत. हे मूलभूत वास्तव असल्यामुळे शेती-क्षेत्राला झुकते माप दिले पाहिजे. हे घडत नाही, कारण सरकारवर व खासदारांवरही प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे कॉर्पोरेट क्षेत्राचा प्रभाव दिसत आहे. कारण 'कॉर्पोरेट क्षेत्रा'ची व्यूहरचनाच अशी आहे, की खासदार निवडून आले की त्यांच्यावर प्रभाव टाकण्याची व्यवस्था केली जाते. सर्वच खासदार या प्रभावाला बळी पडतात असे नाही. पण सरकारच्या निर्णयप्रक्रियेवरच प्रभाव असल्यामुळे खास-दारांना शेतीक्षेत्राची बाजू समर्थपणे मांडण्याची संधीच मिळत नसावी! किंवा तसा प्रयत्न करूनही उपयोग होत नसावा. परिणामी, रिझर्व्ह बँक आणि इतर राष्ट्रीयी-कृत बँका 'कॉर्पोरेट क्षेत्राच्या'च ताब्यात आहेत.

कॉर्पोरेट क्षेत्राच्या प्रभावामुळे रिझर्व्ह बँकेच्या संचालक मंडळाप्रमाणेच राष्ट्रीयीकृत बँकांवरही बड्या उद्योगांना प्रतिनिधित्व आहे. पण शेतीक्षेत्राचे प्रतिनिधी नाहीत. नीरा राडियांचे 'टेप प्रकरण' उघड झाल्यामुहे हे बडे उद्योग कसा प्रभाव टाकतात, याची व्यूहरचना स्पष्ट झाली आहे. राष्ट्रीयीकृत बँकांवर केवळ बड्या उद्योगांचे प्रतिनिधी आणि वरिष्ठ नोकरशहा संचालक असतात. सरकारच्या वरिष्ठ नोकरशहांवरही आपला प्रभाव कायम कसा ठेवावा, याची व्यवस्था या कॉर्पोरेट क्षेत्राने केलेली असते. या तुलनेत शेती-कर्जाची काय स्थिती आहे? शेतीला कर्जे मिळत नाहीत, अर्धवट मिळतात, असंख्य अटी असतात आणि नकारात्मक भूमिकेमुळे शेतकरी कर्जासाठी येऊ नयेत, अशी व्यवस्था केली जाते.

**कर्जमाफीचे धोरण आणि बँकांचा नकारात्मक प्रति-साद**

ग्रामीण भागाच्या विकासासाठी आणि शेतकऱ्यांना सवलती देण्यासाठी सरकारने आणि रिझर्व्ह बँकेने जाहीर केलेले धोरणात्मक निर्णय सरकार-नियंत्रित राष्ट्रीयीकृत बँका बदलतात हे विशेष. शाखा काढण्याऐवजी ग्रामीण भागात प्रतिनिधी नेमण्याचा पर्याय याच बँकांनी पुढे केला. कर्जमाफीच्या सवलत योजनेत दोन हेक्टर (पाच एकर) लागवडीखालील जमीन असा स्पष्ट निकष रिझर्व्ह बँकेने जाहीर केला. लागवडीखालील जमीन ७/१२ च्या उताऱ्यावरून ठरविता येते. पण बँकांनी रिझर्व्ह बँकेला डावलून एक काल्पनिक प्रश्नावली तयार केली व निकष बदलला आणि एकूण जमीन असा निकष लावून ज्यांना कर्जमाफीच्या सवलतीचा लाभ मिळणार होता, त्यांना या योजनेतून वगळले. रिझर्व्ह बँकेचा स्पष्ट निकष बदलण्याचे कसब या बँकांनी केले व त्यासंबंधीच्या तक्रारी केंद्र सरकार आणि रिझर्व्ह बँक यांच्याकडे जाऊनही अशी प्रकरणे रेंगाळली आहेत. कर्जमाफी योजनेतील त्रुटी आणि बँकांची सदोष कार्यवाही यांमुळे सर्व संबंधित शेतकऱ्यांना कर्जमाफी मिळाली नाही. परिणामी ते शेत-करी वंचित आहेतच. शिवाय नंतरच्या काळात अवकाळी पाऊस, पिकास मारक हवामान, शेतमालाच्या घाऊक खरेदीची कमी किंमत आणि दलालांनी ग्राहकांना विक्री-साठी वाढविलेली भरमसाठ किंमत यांमुळे उत्पादक शेतकऱ्यांचे होणारे नुकसान व पिळवणूक यामुळे शेती-क्षेत्रांतील अडचणी व आर्थिक संकटे वाढतच आहेत. अशा स्थितीत कर्जमाफी व इतर सवलती मिळाव्यात, अशी शेतकऱ्यांची रास्त अपेक्षा आहे. कॉर्पोरेट क्षेत्राला दरवर्षी करांत सूट व इतर सवलती मिळतात, त्याप्रमाणे शेतीक्षेत्रालाही प्रतिवर्षी सवलती मिळाल्या पाहिजेत.

**प्रतिवर्षी उद्योगाना कर्जमाफी, शेतीला का नाही?**

देशाची आर्थिक-सामाजिक प्रगती कोणत्याही एका क्षेत्राच्या प्रगतीतून होत नाही. उद्योगाच्या विकासामुळे रोजगार वाढतो, आर्थिक उलाढाल वाढते, निर्यात केली तर परदेशी चलनाचाही फायदा होतो. पण केवळ उद्योग वाढले आणि शेतीक्षेत्र उपेक्षित राहिले, तर शहरे विकसित होतील, काही घटक श्रीमंत होतील, नोकरदारांच्या हातात पैसा खेळेल; पण खेडी अविकसित राहतील आणि शेतीक्षेत्रातील उत्पादनावर अनिष्ट परिणाम होईल. नागरी विकासाला चालना देण्यासाठी ग्रामीण भागांत अन्नधान्याचेही उत्पादन वाढले पाहिजे. साखर, गूळ, भाजीपाला यांची






गरज केवळ उत्पादक शेतकऱ्यांनाच नसते; ती शहरांच्या, उद्योगाने समृद्ध झालेल्या क्षेत्रालाही असते. गावांतून येणाऱ्या शेतीमालावर शहरांतील नागरिकांचे जीवन अवलंबून असते. शेतीमालाचे उत्पादनच झाले नाही, तर उद्योजक आणि त्यांच्यावर अवलंबून असणारे कामगार-नोकरदार उपाशी राहतील. यासाठी उद्योगांना ज्या अमाप सवलती दिल्या जात आहेत, तशा विविध सवलती शेतीक्षेत्रालाही मिळाल्या पाहिजेत.

शेतीक्षेत्राचे देशाच्या विकासाच्या वाटचालीतील महत्त्व ओळखून वेळोवेळी शेतीवर येणाऱ्या संकटकाळात राज्य आणि केंद्र सरकारांनी शेतीक्षेत्राला मदत करणे अपरिहार्य आहे. अवर्षण, अतिवृष्टी, अवकाळी पाऊस अशा नैसर्गिक संकटांत शेती वेळोवेळी सापडते. शेतीमालाला उत्पादनखर्चाच्या आधारावर किंमत मिळत नाही. सरकारने कितीही घोषणा केल्या, फतवे काढले, तरी राष्ट्रीयीकृत बँका उद्योगांना आणि कॉर्पोरेट कंपन्यांना ज्या उत्साहाने कर्जे देतात, तो उत्साह शेतीला कर्जे देताना दिसत नाही. यामुळे आजही गरजू शेतकरी खासगी सावकारशाहीत अडकत आहे. सहकारी अर्थव्यवस्थेतून मिळणारे कर्ज जास्त व्याजामुळे महाग पडते. या वास्तवाचा विचार केला, तर शेतकऱ्यांना कधीतरी मिळणारी कर्जमाफी हा तात्पुरता उपाय आहे. कर्जमाफीत आणि इतर सवलतींत सततचा ओघ पाहिजे, जसा तो उद्योगांना आहे. प्रतिवर्षी उद्योगांना काही हजार कोटींची करमाफी व कर्जमाफी मिळते. हा प्रकार प्रतिवर्षी घडतो. मग शेतकऱ्यांची कर्जमाफी कधीतरी, पुन्हा नाही, असा निर्णय समान न्यायाचा आहे काय?

कॉर्पोरेट क्षेत्रातील उद्योगांना बँका प्रतिवर्षी कर्जमाफी कशी देतात, याचा गौप्यस्फोट अखिल भारतीय बँक कर्मचारी संघटनेनेच केला आहे. या संघटनेने स्पष्ट केले आहे की बड्या, श्रीमंत उद्योगपतींना बँका कोट्यवधी रुपयांची कर्जे देतात. परतफेडीची ऐपत असूनही ही कर्जे थकित होतात. तीच कर्जे पुन्हा फेरकर्जात रूपांतरित करतात आणि पुन्हा पुन्हा कर्जे थकली की, बँका सरळ ही कोट्यवधींची कर्जे माफ करतात. ऐपत असणाऱ्या श्रीमंत उद्योगांची कर्जे प्रतिवर्षी माफ होत असतील, तर लहान, मध्यम, गरजू शेतकऱ्यांची कर्जे प्रतिवर्षी का माफ केली जात नाहीत? सरकार, रिझर्व्ह बँक व अर्थमंत्रालयाने याचा खुलासा केला पाहिजे.

**उद्योगक्षेत्राप्रमाणे शेतीक्षेत्राचीही निर्दोष वर्गवारी पाहिजे.**

उद्योगक्षेत्रापेक्षा शेतीक्षेत्राचे महत्त्व जास्त असूनही या क्षेत्रातील जमीनधारक शेतकऱ्यांची निर्दोष वर्गवारी झालेली नाही. देशाच्या विविध भागांत शंभर-दोनशे एकरांवर जमीन असणारे शेतकरी आहेत, त्याचप्रमाणे दोन-पाच एकर शेती असणारे शेतकरी आहेत. लहान व मोठ्या शेतकऱ्यांची निर्दोष वर्गवारी अजून झालेली नाही. शेतजमिनीशी संबंध असणाऱ्या सरकारच्या महसूल खात्याने शेतजमिनींच्या गुणवत्तेचा अगर आनुषंगिक बाबींचा कोणताही विचार न करता शेतकऱ्यांची वर्गवारी केली असल्यामुळे ती पूर्णपणे चुकीची आहे. शिवाय अशी वर्गवारी देशातील निरनिराळ्या राज्यांत निरनिराळी आहे. शेतीसाठी सवलती देताना अगर कर्जासाठी काहीतरी वर्गवारी असावी या तात्कालिक सोयीसाठी वर्गवारी केली असल्यामुळे ती शेतीक्षेत्रातील वास्तवाशी विसंगत आहे. उद्योगक्षेत्रात लघुतम, लघुउद्योग, मध्यम उद्योग व मोठे उद्योग अशी वर्गवारी आहे, त्याप्रमाणे शेताची वर्गवारी केली पाहिजे. उद्योगक्षेत्रातील वर्गवारी ज्या निकषावर केली आहे, ते निकष महत्त्वाचे आणि वास्तवाशी सुसंगत असल्यामुळे त्याच पद्धतीने शेतीक्षेत्राची वर्गवारी केली पाहिजे. जागा व यंत्रसामग्री २५ लाखांपर्यंत असेल तर लघुतम उद्योग, १५ लाख ते ५ कोटीपर्यंत जागा व यंत्रसामग्री असेल तर लघुउद्योग, ५ कोटीपासून १० कोटीपर्यंत जागा व यंत्रे असतील तर मध्यम उद्योग व १० कोटीवरील सर्व मोठे उद्योग अशी उद्योगांची वर्गवारी आहे. याचप्रमाणे शेतीक्षेत्रातील वर्गवारी करावी लागेल. ३ हेक्टर बागाईत अगर सहा-सात हेक्टर जिराईत जमीन असणारा अल्पभूधारक शेतकरी, ५ हेक्टरपर्यंत बागाईत अगर १० हेक्टरवर जिराईत जमीन असेल तर लहान शेतकरी, १० हेक्टर बागाईत अगर २० हेक्टर जिराईत जमीन असेल तर मध्यम शेतकरी आणि २० हेक्टरवर बागाईत अगर ३० हेक्टरवर जिराईत जमीन असेल, तर मोठे शेतकरी अशी शेतीक्षेत्रातील वर्गवारी करणे जरुरीचे आहे. एकदा अशी निर्दोष वर्गवारी झाली, तर

शेतीक्षेत्रातील विविध योजना, सवलती, कर्जमाफी, व्याज-माफी, नुकसानभरपाई यांसंबंधीची कार्यवाही करताना त्यासंबंधीचे निकषही निर्दोष करता येतील.

**शेतीतज्ज्ञांच्या समितीने वास्तवाचा विचार करून कर्जयोजना तयार कराव्यात.**

गरजू शेतकऱ्यांनी कितीही अपेक्षा केल्या, तरी राष्ट्रीयीकृत बँका शेतीसाठी स्वतंत्र योजना जाहीर करणार नाहीत. कारण त्यांच्यावर कॉर्पोरेट क्षेत्राचा प्रचंड प्रभाव आहे. मोठ्या औद्योगिक कंपन्यांसाठी या बँका कोटी कोटी रुपयांची कर्जे सहज देतील आणि थकल्यावर माफही करतील; पण शेतीक्षेत्रासाठी या बँका केवळ देखावा करीत राहतील. बँकांच्या या नकारात्मक भूमिके-मुळे आता शेतीतज्ज्ञांची समिती नेमून शेतीसाठी विविध कर्जयोजना तयार करण्याची जबाबदारी या समितीवरच सोपविली पाहिजे. सरकारने आणि रिझर्व्ह बँकेने हे तातडीने केले पाहिजे. यासारखी स्वतंत्र व्यवस्था केल्या-शिवाय शेतीक्षेत्राला खरा न्याय मिळणार नाही. कारण शेतीक्षेत्राबाबत बँकांची भूमिका सकारात्मक नाही. शेतीसाठी कर्जमागणी करणारे कर्जदार बँकेत गेल्यावर बँकांचे अधिकारी त्यांच्याशी सरळ बोलत नाहीत, ग्राहक या नात्याने त्यांचा सन्मान करीत नाहीत आणि काहीतरी निकष सांगून बाहेरचा रस्ता दाखवितात, असा बऱ्याच शेतकऱ्यांचा अनुभव आहे.

शेतीसाठी विविध कर्जयोजना तयार करण्यासाठी शेतीतज्ज्ञांच्या समितीने शेतीतील वास्तवाचा पूर्ण अभ्यास करून योजना तयार कराव्यात. सतत बदलणारे ऋतुचक्र आणि हवामान, पाणीपुरवठ्याची कमी-अधिक परिस्थिती, अवकाळी पावसासारखी अस्मानी संकटे, शेतकऱ्यांच्या शेतीशिवाय इतर कौटुंबिक गरजा आणि या स्थितीमुळे परतफेडीस होणारा विलंब, त्यासाठी कर्जाची फेररचना करण्याची सुविधा, व्याजात सवलती आणि गरजेप्रमाणे तत्काळ पैसे मिळण्याची कॅश-क्रेडिटसारखी सुविधा अशा सर्व बाबींचा विचार करून शेतीकर्जाच्या खास योजना तयार केल्या पाहिजेत व त्यानुसारच कार्यवाही करण्याची सक्ती बँकांवर केली पाहिजे. कारण रिझर्व्ह बँकेचे आदेशही बँका धुडकावून लावतात, निकष बदलून सवलती टाळतात, असे प्रकार वेळोवेळी दिसत आहेत. यासाठी बँकांवर शेती-कर्जयोजना तयार झाल्यावर त्याप्रमाणे वितरण करण्याची सक्ती केली पाहिजे.

भारत हा शेतीप्रधान देश असूनही शेतीक्षेत्राची उपेक्षा झाली आहे आणि होत आहे, याचे भान केंद्र आणि राज्य सरकारांना स्वातंत्र्यानंतरच्या पाच तपांनंतर येत आहे व आता शेतीक्षेत्रास अनुकूल वातावरण निर्माण होईल, अशी लक्षणे दिसत आहेत. पण त्यासाठी बहुसंख्य ग्रामीण मतदारांच्या मतावर निवडून येणाऱ्या खासदार-आमदारांनी शेतीची उपेक्षा रोखण्यासाठी व अर्थव्यवस्थेत या क्षेत्राला अनुकूल बदल घडविण्यासाठी सतत जागरूक राहिले पाहिजे व आगामी अर्थसंकल्पात या दृष्टीने सकारात्मक निर्णय घेण्यासाठी राज्यकर्त्या सरकारच्या धोरणावर प्रभाव टाकला पाहिजे. हे कितपत आणि कसे घडते, हे आगामी अंदाजपत्रकावरूनच स्पष्ट दिसणार आहे.



# संहिताचिकित्साशास्त्र आणि लीळाचरित्राची संपादने

श्री. रत्नाकर बापूराव मंचरकर

**प्रास्ताविक**

मराठीच्या उषःकाली गद्यामध्ये 'लीळाचरित्र' – (इ.स.१२७८) आणि काव्यामध्ये 'ज्ञानेश्वरी' (इ.स. १२९०) हे दोन महाग्रंथ आविर्भूत झाले आणि त्यांनी मराठीला सुप्रतिष्ठित केले. या दोन्ही महाग्रंथांच्या संपादनांच्या परंपरा अतिशय जुन्या काळापासून आजतागायत चालत आलेल्या आहेत. हिराइसा-पाठ (इ.स. १३२८-१३३०) हा 'लीळाचरित्रा'च्या संपादनाचा आरंभ आहे, तर एकनाथीज्ञानेश्वरी (इ.स. १५८४) हा 'ज्ञानेश्वरी'च्या संपादनाचा आरंभ आहे. 'ज्ञानेश्वरी'च्या संपादनांची जेवढी चर्चा झाली, तेवढी 'लीळाचरित्रा'च्या संपादनांची झालेली नाही. येथे आपण 'लीळाचरित्रा'च्या संपादनांचा विचार करणार आहोत. त्यासाठी संपादन आणि संहिता-चिकित्साशास्त्र यांची प्राथमिक ओळख करून घेणे उपयुक्त होईल.

**संहिता-संपादन : स्वरूप व पद्धती**

सं + पद् (चतुर्थगणी, आत्मनेपदी) या मूळ धातूचे 'संपादयति' असे प्रयोजक रूप तयार होते. त्याचा अर्थ तयार करणे, पूर्ण करणे, समृद्ध करणे असा आहे. बदल करणे, रूपांतर करणे असाही त्याचा अर्थ आहे. साहित्यसामग्रीचे व्यवस्थापन करणे, संपादकीय संस्करण करून संहिता समाजात प्रसारित करण्यासाठी सिद्ध करणे, असा 'संहिता-संपादन' या संज्ञेचा अर्थ करता येईल. असे संपादन करणाऱ्यास 'संपादक' असे म्हणतात.

मनोगताला शब्दरूप लाभल्याने संहिता सिद्ध होते. ती मौखिक असेल किंवा लिपिबद्ध असेल. संहितेच्या घटक शब्दांना 'पाठ' असे म्हणतात. हे पाठ लेखकाला मान्य असलेले, अभिप्रेत असलेले असावे लागतात. असे असेल तरच संहितेचे केलेले गुणदोषविवेचन न्याय्य ठरू शकेल. अशा प्रकारे लेखकमान्य संहिता हाच साहित्याच्या संशोधनाचा व समीक्षेचा पाया असतो.

तथापि लेखकाची संहिता नेहमीच अविकृत किंवा शुद्ध स्वरूपात उपलब्ध असते, असे नाही. मौखिक पठन, गायन, कथन, पारायण, हस्तलिखित प्रतीकरण आणि मुद्रण अशा निरनिराळ्या माध्यमांनी समाजात संहितेचे अभिसरण होते, प्रसारण होते. या प्रक्रियेत संहितेतील पाठ बदलतात. ऐकून-लिहून घेताना श्रवणदोषाने किंवा पाहून लिहिताना दृष्टिभ्रमाने लेखनात नकळत व सहजपणे बदल होतात. जोपर्यंत त्यामुळे अर्थाच्या दृष्टीने फरक पडत नाही, तोपर्यंत अशा अक्षररूपांतरित पाठभेदांकडे फारसे लक्ष देण्याचे कारण नसते. पण कधी संहितेत जाणिवपूर्वक बदल केले जातात. अवघड पाठांऐवजी सोपे पाठ वापरले जातात. त्यामुळे पाठांचे अर्वाचीनीकरण होते. कधी मूळ पाठ न समजल्याने दुरुस्तीचे प्रयत्न होतात. त्यातून नवे पाठ निर्माण होतात. कधी स्वतःच्या मताचा प्रसार, स्वकालीन संकेत व अभिरुची यांनुसार संहितेत बुद्धिपुरस्सर बदल केले जातात.अशा अर्थांमध्ये परिवर्तन घडविणाऱ्या पाठांचा विचार करावा लागतो.

अशा पाठांनाच पाठांतरे, भिन्न पाठ, किंवा पाठभेद म्हणतात. त्यांतील चुकीच्या, सदोष पाठांना भ्रष्ट, अशुद्ध किंवा अपपाठ म्हणतात. संहितेत असे अपपाठ घुसतात, पाठांतरे निर्माण होतात. तिच्या रचनाक्रमात बदल होतात. संहितेतील काही भाग गाळला जातो (अवक्षेप), तर काही भाग नव्याने घातला जातो (प्रक्षेप). संहितेत विरोध, विसंगती, दुर्बोधता, अपूर्णता, विस्कळितपणा येऊ लागतो. संहितेच्या वेगवेगळ्या आवृत्त्या प्रचलित होऊ लागतात. त्यामुळे मूळ लेखकाला नेमके काय म्हणावयाचे होते, याविषयी संभ्रम निर्माण होतो.

अशा वेळी मूळ संहितेचा शोध घेण्याची गरज जाणवू लागते. येथेच संहिताचिकित्साशास्त्राचा आरंभ होतो. अपभ्रष्ट संहितारूपाचा शोध घेऊन आणि शुद्धी करून लेखकाची संहिता किंवा निदान त्याला अभिप्रेत असलेली संहिता अनुमानित करणे हेच संहिताचिकित्सा-

अनुक्रमणिका

शास्त्राचे उद्दिष्ट असते.

त्यासाठी संहितेच्या उपलब्ध हस्तलिखित प्रती, मुद्रित प्रती आणि पूरक साम्रगी या अभ्याससाधनांची शास्त्रीय मांडणी करावी लागते. प्रतींचे वर्णन व वर्गीकरण करून त्यांचे परस्परसंबंध दिग्दर्शित करावे लागतात. पाठांची तुलना, चिकित्सा आणि निश्चिती करताना आवश्यक तेथे साधार व सकारण विवरण करावे लागते. अभ्यासाला पूरक अशा सूची व माहितीपूर्ण परिशिष्टे जोडावी लागतात. या प्रकारच्या कामास संहिताचिकित्साशास्त्रात संहितानिष्ठ पायाभूत चिकित्सा (Lower criticsm ) म्हणतात.

संहितासंपादनाचे दोन प्रकार आहेत. त्यांनुसार या चिकित्सेचे स्वरूप बदलते. उपलब्ध हस्तलिखितांमधील विश्वसनीय वाटणाऱ्या एका प्रतीची संहिता प्रमाण मानून ती यथामूल स्वरूपात द्यावयाची व तळटीपांतून इतर प्रतींतील पाठांची नोंदणी करावयाची, ही विशिष्ट वस्तुनिष्ठ संपादनपद्धती होय. ही पद्धती सरळ, तुलनेने सोपी व कमी धोक्याची असली, तरी तिच्यामुळे संहितेच्या मूल-स्थापनेचे उद्दिष्ट साध्य होत नाही. या पद्धतीस 'ज्ञेयनिष्ठ'- म्हणजे जी जाणावयाची आहे ती विशिष्ट संहिता जेथे महत्त्वाची मानली जाते, अशी पद्धती असेही म्हणतात.

दुसऱ्या पद्धतीत हस्तलिखितांचे संकलन, पाठ-नोंदणी, पाठसंतुलना, कुलवृक्ष, या क्रमाने संपादनसामग्रीची व्यवस्था लावली जाते. वंशमूलपद्धती, अनुमान आणि अंत:स्फुरण यांच्या साहाय्याने अंतर्गत व बाह्य प्रमाणांचा विचार करून पाठनिश्चिती केली जाते. त्यातील पाठ संशोधित व अनुमानित असतात. ही संहिता पुनर्रचित असते आणि जशीच्या तशी कोणत्याही एका हस्तलिखितात नसते. संहिताचिकित्साशास्त्राची तत्त्वे, तंत्रे व निकष यांच्या कसोटीवर ही निवड केली जाते. तरीही तीविषयी निर्णय घेणारा संपादकांचा विवेक येथे महत्त्वाचा ठरतो; म्हणून ही विशिष्ट दृष्टिनिष्ठ संपादनपद्धती होय. या पद्धतीस 'ज्ञातृनिष्ठ' पद्धती असेही म्हणतात. येथे जो ज्ञाता- म्हणजे जाणणारा आहे, त्याच्या विवेकाला अधिक महत्त्व असते.

पायाभूत संहिताचिकित्सा करताना हस्तलिखितांचे संकलन करणे हे संपादकाचे पहिले काम ठरते. काळाच्या तडाख्यातून वाचलेली संहितेची उपलब्ध हस्तलिखिते व मुद्रित प्रती ही संपादनाची मूलभूत चिकित्सासामग्री असते. त्यातील चिकित्सापात्र पाठप्रतींची अक्षरे व अंक यांचे संकेत वापरून बोधाक्षरांसह माहिती द्यावी लागते. प्रत कोठे व कोणाकडे उपलब्ध झाली; नकलकाराचे नाव, लेखनकाळ, नमने व पुष्पिका, ओळीतील अक्षरसंख्या, पानातील ओळींची संख्या, पृष्ठसंख्या, पानांचा आकार, अक्षरवाटिका, बांधणीची वैशिष्ट्ये, कागदाचे स्वरूप अशी माहिती नोंदवावी लागते.

पाठनोंदणीसाठी चौकोन असलेला पुरेसा मोठा कागद घेण्याची पद्धती आहे. त्याच्या वरच्या ओळीत प्रत्येक चौकोनात एक वर्ण अशा रीतीने प्रचलित प्रतीतील एक ओळ लिहितात. त्याखाली निरनिराळ्या प्रतींतील पाठ-भेदांची तेवढी नोंद केली जाते. डाव्या बाजूच्या समासात संबधित हस्तलिखिताचे संकेतचिन्ह लिहिले जाते. उजव्या बाजूच्या मोठ्या समासात टिपणी, दुरुस्ती, सुधारणा, अधिकचा मजकूर यांची नोंद केली जाते. त्यामुळे पाठभेदांचे समग्र विश्व डोळ्यांसमोर उभे राहते. त्यांचे बलाबल लक्षात घेऊन निर्णय घेता येतात. संपादकांनी निश्चित केलेली अशी ओळ शेवटच्या ओळीत लिहिता येते.

पाठनोंदणी आणि पाठसंतुलन यांमुळे संहितेच्या उपलब्ध आणि त्यावरून अनुमानित करता येतील अशा अनुपलब्ध प्रतींचे परस्परसंबंध स्पष्ट होतात. त्यांच्या आराखड्यास 'कुलवृक्ष' असे म्हणतात. संकलित केलेल्या हस्तलिखितांचा दर्जा, महत्त्व व वैशिष्ट्य त्यातून स्पष्ट होते. आधारास घ्यावयाच्या प्रतींची संख्या मर्यादित करता येते. प्रतीप्रतींचे तौलनिक महत्त्व लक्षात येते. विश्वसनीय व स्वीकारार्ह पाठ ठरविण्याची दिशा सापडू शकते. संहिताशोधकाच्या दृष्टीने कुलवृक्ष हा वर मूळ व खाली शाखा असलेल्या अश्वत्थवृक्षासारखा असतो. संहिता ज्या क्रमाने भ्रष्ट होत गेली, त्याच्या विरुद्ध क्रमाने शुद्ध करीत त्याला मुळापर्यंत जावयाचे असते. हस्तलिखितां-वरून मालिकामूल हस्तलिखितांचे अनुमान करीत संहिता-निश्चितीचा प्रवास सुरू होतो. शाखाप्रत–कुलप्रत–कुलमूल प्रत–समांतर मूलरूप प्रत–मूलरूप प्रत–मूळ प्रत या क्रमाने हा प्रवास संपतो. अर्थात पुरावा मर्यादित असेल तर तो मध्येच एखाद्या टप्प्यावर थांबू शकतो.

संहितेच्या प्रती हे पाठनिश्चितीचे अंतर्गत प्रमाण







अनुक्रमणिका

होय. त्याच्या जोडीला मूळ ग्रंथांचे आधार, सार, भाषांतरे, त्यांतील वेचे, अवतरणे, त्यांवरील टीका ही पूरक साधने विचारात घेता येतात. लेखकाच्या इतर साहित्यकृती, त्याची पूर्व आणि उत्तर वाङ्मयीन परंपरा यांचाही बाह्य प्रमाणे म्हणून विचार करता येतो.

संहितेच्या प्रती आणि पूरक बाह्य प्रमाणे यांचे सामग्री-संतुलन करून संहितेत स्वीकारण्यासाठी पाठांची निवड करावी लागते. त्यासच पाठनिश्चिती असे म्हणतात. यासाठी काही मार्गदर्शक तत्त्वे सांगितली जातात. बऱ्या पाठापेक्षा खऱ्या पाठाचा शोध घ्यावा; अर्वाचीन पाठापेक्षा पुरातन पाठ ग्राह्य मानावा; सुलभ पाठाऐवजी कठीण पाठ निवडावा; पाठांची निवड भाषेच्या कसोटीवर करावी; एका प्रतीपेक्षा अनेक प्रतींत आढळणारा पाठ प्रतींच्या तौलनिक बलाबलाचा विचार करून ग्राह्य मानावा; ही अशी काही तत्त्वे होत.

त्यांच्या आधारे हस्तलिखितांच्या पुराव्याची चौकट सांभाळून कुलमूलपद्धती, अनुमान व अंतःस्फुरण यांचा आवश्यक तेथे तारतम्याने वापर करून लेखकाची किंवा त्याला अभिप्रेत अशी मूलसंहिता पुनर्रचित करावी लागते. प्रक्षेपांचे विरेचन, वर्जिताची यथास्थानी पुनःस्थापना, पर्यायी मजकुराची सुयोग्य निवड, रचनाक्रमातील बदलांची पुनर्मांडणी करून संहितेला पुष्कळच नीटस आणि निर्दोष रूप द्यावे लागते. अपपाठ दूर करून मूळ पाठांची निश्चिती करावी लागते.

अशा संशोधित प्रतीमुळे अनेक ठिकाणी अर्थाचा अनर्थ टळतो, दुर्बोधता उणावते, कलात्मकता ठसते, संदर्भांचा उलगडा होतो आणि भाषेचे जुने ठेवणे लखलखीत रूपात प्रकट होते.

संहितेच्या पायाभूत चिकित्सेजवळ संहिताचिकित्सा थांबत नाही. संहिता तिच्या मूलरूपाशी जवळीक साधणाऱ्या अविकृत व निर्दोष रूपात सिद्ध झाल्यावर तिच्या अधिक अभ्यासाचा मार्ग मोकळा होतो. ग्रंथाचा कर्ता व त्याचा काळ ठरविणे, ग्रंथाचा रचनाकाळ व रचनाक्रम ठरविणे, यासाठी प्रयत्न करता येतात. लेखकाने स्रोतग्रंथांचा कोठे, किती व कसा वापर केला आहे, याचा छडा लावता येतो. लेखक, त्याची इतर रचना, तत्कालीन भाषा, वाङ्मय आणि जीवन यांचा अनुबंध तपासता येतो. त्यातून संहिता आणि तिचे सांस्कृतिक पर्यावरण या दोन्हींचे वेगळेच दर्शन घडते आणि त्यांच्या परस्परसंबंधांची यथार्थ जाणीव होते. ही संहितानुबंधी चिकित्सा (हायर क्रिटिसिझम) होय. तिला संहितेच्या पायाभूत चिकित्सेचा आधार असतो. संहिताचिकित्सेची ही दोन मूलभूत अंगे होत.

**संहितासंपादनाचे आणखी काही प्रकार**

आपण कोणासाठी संपादन करीत आहोत, याचे भान संपादकाला असावे लागते. संपादनाचा अपेक्षित वाचक आणि संपादनाचे उद्दिष्ट यांवर संपादित आवृत्तीचे स्वरूप ठरते. त्यानुसार बालांसाठी आवृत्ती, शालेय आवृत्ती, महाविद्यालयीन आवृत्ती, प्रौढ साक्षरांसाठी आवृत्ती, परभाषकांसाठी आवृत्ती, सर्वसाधारण आवृत्ती आणि अभ्यासकांसाठी आवृत्ती अशा वेगवेगळ्या आवृत्त्या असतात.

'लीळाचरित्रा'च्या वेगवेगळ्या भागांच्या आवृत्त्या वेग-वेगळ्या प्रकारच्या आहेत आणि त्यांची संख्याही पुष्कळच आहे. 'लीळाचरित्रा'ची समग्र संहिता पुढे ठेवणाऱ्या संपा-दनांचाच आपण येथे विचार करणार आहोत. या आवृत्त्या मुख्यतः तीन ठळक प्रकारांतील आहेत. महाविद्यालयीन विद्यार्थी, अभ्यासक आणि सांप्रदायिक भक्तजन यांच्या-साठी या आवृत्त्या तयार झालेल्या दिसतात.

महाविद्यालयीन आवृत्तीची संहिता आधारासाठी स्वीकारलेल्या हस्तलिखित/मुद्रित प्रतीप्रमाणे असावी (जसे, 'वछाहरण'– डॉ. वि. भि. कोलते १९३५). त्याच-प्रमाणे ती पुनर्रचित चिकित्सक संहिताही असू शकते (जसे, 'दमयंती-स्वयंवर' – अ. का. प्रियोळकर १९३५). अशा आवृत्तीला संहितेची पार्श्वभूमी स्पष्ट करणारी आणि तिचा परिचय करून देणारी प्रस्तावना असावी लागते. कठीण शब्दांचा अर्थ देणारा लहानसा कोश, निर्देशसूची इत्यादींची माहितीपूर्ण व उपयुक्त परिशिष्टे असावीत. श्री. ह. ना. नेने, डॉ. शं. गो. तुळपुळे यांच्या समग्र लीळाचरित्राच्या आवृत्त्या या प्रकारच्या आहेत. डॉ. विश्वास पाटील, डॉ. कन्हैय्या कुंदप यांसारख्या अनेकांनी 'एकांका'च्या काढलेल्या वेगवेगळ्या आवृत्त्याही या प्रकारच्या आहेत.

सांप्रदायिक भक्तजनांसाठी अनेक विद्वान महानुभाव महंतांनी 'लीळाचरित्रा'चे संपादन केलेले आहे. अशा

संपादनासाठी संप्रदायमान्य संहिता निवडावी लागते. ती शास्त्रीय पद्धतीचे संस्करण करून देता येते (जसे, 'लीळा-चरित्रा'ची नागपूर प्रत). शास्त्रीय किचकटपणा टाळून सामान्य भाविकाला सहज वाचता येईल अशा स्वरूपातही ती दिली जाते. (जसे, 'लीळाचरित्रा'चा 'स्मरणपाठ'). पंथीयांसाठी आवश्यक ती संहितेविषयीची माहिती प्रस्तावनेत असावी. अर्थबोधक टीपा, संदर्भांचा उलगडा, कठीण शब्दार्थांचा कोश, माहितीपूर्ण परिशिष्टे याही गोष्टी आवृत्तीत असतील, तर तिची उपयुक्तता वाढते. संप्रदायमान्य संहिता सहजपणे उपलब्ध व्हावी आणि ती भक्तजनांना आकलनसुलभ व्हावी, हाच अशा संपादनांचा हेतू असतो.

ग्रंथाचे स्वरूप, महत्त्व आणि अपेक्षित वाचकांच्या गरजा लक्षात घेऊन संपादक आपली आवृत्ती विशिष्ट रूपात सिद्ध करीत असतो. त्याने वापरलेल्या पद्धतीनुसार संपादित आवृत्तीचे स्वरूप ठरते. उपलब्ध सामग्रीतून संपादकाला वैयक्तिक दृष्टीने जे सारगर्भ वाटेल, त्याची निवड करणारी ती 'सारसंग्राहक आवृत्ती' ठरते. संहिता-चिकित्साशास्त्राच्या पद्धतीने व प्रक्रियेने मूळ ग्रंथाची संहिता अनुमानपूर्वक पुनर्रचित करणारी ती 'चिकित्सक आवृत्ती' होय. अशा आवृत्तीस पाठांतरावरील भाष्ये, टीपा, माहितीपूर्ण परिशिष्टे आणि अनेकविध विद्वानांच्या मतांचे चिकित्सक संकलन यांची जोड दिल्यास ती 'सर्वसंग्राहक आवृत्ती' ठरते. यांतील 'चिकित्सक आवृत्ती'चे स्वरूप डॉ. स. गं. मालशे[१] यांनी पुढीलप्रमाणे स्पष्ट केले आहे –

**चिकित्सक आवृत्तीचे स्वरूप**

(१) **संहितानिश्चिती :** चिकित्सक आवृत्तीच्या संपादकाचे ब्रीदवाक्य एकच असले पाहिजे. ग्रंथकाराला आपल्या कृतीची संहिता ज्या स्वरूपात वाचकांसमोर यावी असे वाटत होते, त्या स्वरूपात ती सिद्ध करणे. याचा अर्थ असा की, सर्व लेखनप्रमाद, मुद्रणदोष, विरामचिन्हांतील त्रुटी इ. गोष्टी सुधारून शक्य तितक्या शुद्ध स्वरूपात ग्रंथकृतीची मुद्रणप्रत तयार करणे. खुद्द लेखकाची हस्तलिखित प्रत उपलब्ध असली, तर तीमधील उघड उघड प्रमाद सुधारण्याचे स्वातंत्र्य संपादकाला असते.

(२) **टिपाटिप्पणी :** या पुरेशा दिल्या पाहिजेत. ग्रंथातील शब्दांवर, श्रुतयोजनांवर, आडकथांवर तसेच कमी प्रसिद्ध विशेषनामांवर टिपणे द्यावी. महत्त्वाच्या व्याकरणिक रूपांचेही स्पष्टीकरण द्यावे. खासगी संदर्भांसाठी, लेखक हयात असल्यास, त्याच्याशी पत्रव्यवहार करावा, किंवा वंशजांकडून वा संबंधितांकडून माहिती मिळवावी. 'इस्टुर फाकडा', 'वानरी तैलाचा प्रकार' यांसारख्या दुर्बोध वाटणाऱ्या उल्लेखांवर टिपणे अवश्य पाहिजेत. पौराणिक निर्देश आणि दुर्बोध वाक्प्रचार स्पष्ट केले पाहिजेत.

(३) आधारसंहिता (Copy Text) म्हणजे संपादनार्थ स्वीकृत केलेल्या प्रतीखेरीज अन्य प्रतींतील पाठांतरे तळटीपांत नोंदवली पाहिजेत. स्वयंकल्पित पाठ तारांकित करून दिले पाहिजेत.

(४) ग्रंथाचा वाङ्मयीन रसास्वाद घेता यावा, म्हणून त्याची पार्श्वभूमी स्पष्ट करणारे प्रास्ताविक जोडावे. हस्तलिखित वा मुद्रित प्रतींतून उपलब्ध होणारी, तसेच पत्रव्यवहारादी अन्य साधनांतून आढळणारी ग्रंथसंहितेच्या विकासाची माहिती देऊन तिला नियत रूप कसे येत गेले, तेही दिग्दर्शित केले पाहिजे.

(५) मुद्रण नेटके म्हणजे गौण-प्रधान गोष्टींतील तारतम्य चटकन ताडता येईल, असे असावे.

(६) ग्रंथ वैचारिक असेल, तर निर्देशसूची अवश्य दिली पाहिजे.

(७) ग्रंथाच्या जडणघडणीवर प्रकाश टाकणारे प्रदीर्घ उतारे परिशिष्टात द्यावे.

एकंदरीत संपादकाने, कसलाही हातचा आला मागे न ठेवता, साधनविषयक संपूर्ण माहिती अभ्यासकांपुढे मांडली पाहिजे.

संहितानिश्चितीच्या कार्यासंबंधी एक गोष्ट मात्र प्रथमच स्पष्ट केली पाहिजे. ती म्हणजे कुणीही उठावे नि हाती घ्यावे, असे झटपट रंगारीपणाचे हे काम नाही. या कामात भाषिक ज्ञान, तांत्रिक जाणकारी, तर्कबुद्धी, अफाट परिश्रम आणि प्रदीर्घ प्रतीक्षाक्षमता यांची अगदी कसोटी लागत असते.

या तात्त्विक विवेचनाचा आधार घेऊन 'लीळा-चरित्रा'च्या संपादनांची पहाणी आणि तपासणी आपण

थोडक्यात करणार आहोत.

**लीळाचरित्र : संहितेची अवस्थांतरे**

'लीळाचरित्रा'सारखे ग्रंथ दीर्घकाळ लोकमानसावर प्रभाव गाजवीत आलेले असतात. त्यांच्या संक्रमणाचा व स्थित्यंतरांचा एक इतिहासच तयार झालेला असतो. 'लीळाचरित्र' संहितेच्या अवस्थांतरांचा इतिहास'[२] मी स्वतंत्रपणे लिहिलेला आहे. त्याच्या धावत्या नोंदी येथे करता येतील. म्हाइंभटांनी श्रीनागदेवाचार्य व इतर अनेक संन्रिधानी भक्तजनांच्या सहकार्याने श्रीचक्रधरांच्या जीवन-चरित्राचा हा भव्य प्रकल्प एकहाती पार पाडला (इ. स. १२७८). 'लीळाचरित्रा'ची उपयुक्तता ओळखून सूत्रे, दृष्टान्त, प्रकरणवश यांच्या रूपाने त्याचे सुटे अंश निवडण्याची, संस्कारित व संपादित करण्याची प्रक्रिया तेराव्या शतकापासून सुरू झाली. इ. स. १३०८ मध्ये 'खालसेयाच्या धाडी'त 'लीळाचरित्रा'ची आदिसंहिता चोरीला गेली. पंथीयांना हा ग्रंथ मुखपाठ होता. त्यामुळे त्याचे पहिले पुनर्लेखन उपाध्ये हिराइसा या 'एकसंदी प्रज्ञे'च्या साध्वीने केले. या लीळांच्या 'आदी' म्हणजे शीर्षक देऊन आचार्य परसरामबासांनी हिराइसा-पाठाला पूर्णता दिली (इ. स. १३१०). परसरामबासांच्या पाठाची मूळ प्रत भ्रष्ट होऊ नये, म्हणून त्यांची शिष्या वाचासुंदर बोल्हाइसा हिने ग्रंथ आणि पूजनीय प्रसादविशेष यांच्यासह जलसमाधी घेतली. हा प्रकार महंमद तुघलकाच्या कार-किर्दीत (इ. स. १३२५ ते १३५१) घडला.

अस्मानी व सुलतानी या दोन्हींच्या उपद्रवामुळे 'लीळाचरित्रा'सह महानुभावांचे आरंभकालीन अनेक ग्रंथ वेळोवेळी हरवले, नष्ट झाले. पण अद्‌भुत स्मरणशक्तीच्या बळावर ग्रंथ जिभेच्या टोकावर असणाऱ्या महानुभावांनी त्यांचे पुन्हापुन्हा लेखन केले. आचार्य कवीश्वरबासांचे शिष्य परसरामबास, रामेश्वरबास, धाडी नागाइसा; आनो-बासांचे शिष्य नागनाथबास यांसारख्या अनेक प्रज्ञावंतांनी आपल्या 'घोका'नुसार म्हणजे स्मरणानुसार आपापल्या शिष्यांच्या साहाय्याने वेगवेगळ्या पाठप्रती सिद्ध केल्या. पुढील काळात ही संख्या तेरापासून एक्क्याण्णवपर्यंत सांगितली जाते.

प्रमाणपाठाच्या अभावी 'लीळाचरित्रा'च्या संहितेत पाठांतरे व वासनान्तरे यांचे रान माजले. त्यामुळे आचार्य गुर्जर शिवबासांनी त्याची तृतीय शोधनी केली. हिराइसा पाठ आधाराला घेऊन इतर प्रतींतील पाठ व वासना यांच्या नोंदी करून त्यांनी प्रमाणपाठ घडविला व त्यास 'पिढीपाठ' असे नाव दिले. (इ.स.१४२८). पुढील काळा-तही मतमतांतरे वाढल्याने आचार्य मुरारिमल्लबास विद्वांस यांनी (इ.स.१५५४ ते १६०५) 'लीळाचरित्रा'ची चतुर्थ शोधनी केली. या पद्धतीने वारंवार शोधनी होऊनही 'ऐसें पुरुषाचेनि बुद्धिदोषें आन अभिमानें लीळा वासनान्तरे जाली' म्हणजे पुरुषांच्या बुद्धिदोषामुळे आणि स्वमताच्या अभिनिवेशाने 'लीळाचरित्रा'च्या वेगवेगळ्या संहिता झाल्या.

या पुनर्लिखित सर्व संहिता आदिसंहितेच्या पूर्ण-रूपाच्या नाहीत. 'लीळाचरित्रा'तून जे अंश काढून स्वतंत्र ग्रंथरूपाने नांदत होते, ते यथास्थानी समाविष्ट केले गेले नाहीत. त्यामुळे 'लीळाचरित्रा'ची खंडित संहिता पुनर्लेखनाच्या परंपरेत राहिली.

इ.स. १३५३ पासून महानुभावांचा वाङ्‌मयव्यवहार सांकेतिक लिपीच्या वापरामुळे पंथीयांपुरताच बंदिस्त झाला. इ.स. १३५३ ते १९३४-५० या दीर्घकाळात 'लीळा-चरित्र' सर्वसाधारण मराठी माणसांना अज्ञातच राहिले.

सकळ लिपीतील एका पोथीचे बाळबोध लिप्यंतर करून 'लीळाचरित्र' (इ.स.१९३४ ते १९५०) मुद्रित व संपादित स्वरूपात महाराष्ट्रासमोर प्रथम ठेवण्याचा मान वैदर्भीय संशोधक श्री. ह. ना. नेने यांचा आहे. तेव्हापासून 'लीळाचरित्रा'च्या अर्वाचीन संपादनांची परंपरा आरंभ होते.

**'लीळाचरित्रा'ची संपादने**

'लीळाचरित्र' संहितेची ही अवस्थांतरे पाहिली म्हणजे त्याची सर्वमान्य अशी चिकित्सक प्रत तयार करणे किती अवघड आहे, याची कल्पना येते. अशा तऱ्हेचे 'लीळा-चरित्रा'च्या संपादनाचे जे प्रयत्न अर्वाचीन काळात झाले, त्यांचा थोडक्यात परिचय करून देणे एवढेच काय ते येथे शक्य आहे. विद्यार्थ्योपयोगी, शास्त्रीय आणि सांप्रदायिक अशा तीन गटांत या संपादनांचा विचार करता येईल.

**श्री. ह. ना. नेने प्रत**

मराठी भाषा व वाङ्‌मय यांचा विद्यापीठीय अभ्यास-क्रमात समावेश झाला. याच सुमारास 'पूर्व दिव्य ज्यांचे रम्य त्यांना भावी काल' या वृत्तीने जुन्या वाङ्‌मयाकडे








आधुनिक सुशिक्षितांचे नव्याने लक्ष वेधले. त्यांच्या शोधाला, संपादनाला व प्रकाशनाला गती मिळाली. महाविद्यालयीन विद्यार्थी डोळ्यांसमोर ठेवून संपादने केली गेली.

'लीळाचरित्रा'चे असे पहिले संपादन ह. ना. नेने[३] यांचे आहे पाच भाग इ.स. १९३६ ते १९५०. सकळ, लिपीतील एका जुन्या हस्तलिखिताचे बाळबोध लिपीत रूपांतर करून ही प्रत तयार झाली. या हस्तलिखितावर कालनिर्देश नसला, तरी ही पोथी सुमारे २५० वर्षांपूर्वीची असावी, असे नेने म्हणतात. इ.स. १९५४ ची तिसरी आवृत्ती प्रसिद्ध करताना जुन्या दोन-तीन हस्तलिखित पोथ्यांच्या साहाय्याने मूळ भाग तपासून शुद्ध केल्याचे ते सांगतात. अवतरणचिन्हांचा केलेला वापर सोडल्यास नेन्यांनी संहिता यथामूल देण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. तथापि हस्तलिखिते कोठून उपलब्ध झाली त्यांचे नेमके, वर्णन, त्यांची परंपरा, त्यांचा काळ यांविषयी त्यांनी कोणतीही माहिती दिलेली नाही. नेमक्या कोणत्या दुरुस्त्या कशाच्या आधारावर व कशा पद्धतीने केलेल्या आहेत, याचा खुलासा त्यांनी केलेला नाही. त्यामुळे नेने यांच्या संपादित संहितेचे प्रामाण्य कशाने ठरविता येत नाही. संपादकाला उपलब्ध झालेल्या हस्तलिखितांतील एक संहिता निवडून ती यथामूल देणे आणि इतर प्रतींतील पाठभेद नोंदविणे ही त्यांची पद्धती दिसते. संपादनशास्त्रात अशा संपादनाला 'ज्ञेयनिष्ठ' – म्हणजे जी जाणावयाची आहे त्या संहितेशी एकनिष्ठ राहून केलेले संपादन, असे म्हणतात. अशी संहिता निवडण्यामागे संपादकाची काही कारणे असतात, विशिष्ट भूमिका असते. असे काही विवेचन ह. ना. नेने यांनी केलेले नाही. तरीही त्यांचे संपादन 'ज्ञेयनिष्ठ' किंवा 'विशिष्ट वस्तुनिष्ठ' पद्धतीचे आहे.

महाविद्यालयीन विद्यार्थी डोळ्यांसमोर ठेवून नेने यांनी संपादन केलेले आहे. प्रत्येक लीळेच्या 'आदि'चा आजच्या मराठीतील अर्थ, स्वीकृत संहिता, क्वचित पाठभेदांच्या नोंदी, अर्थबोधक टीपा, व्याकरणविशेष, शब्दकोश आणि विस्तृत उपोद्घात देऊन विषय वाचकांच्या आटोक्यात आणून दिला आहे. नेने यांनी व्याकरणविषयक भाग फार बारकाईने लिहिलेला आहे. त्यांचा उपोद्घात (पृ. १५ ते ५५) मार्मिक आणि प्रासादिक आहे. लीळाचरित्राचे भाषा, साहित्य, समाजदर्शन आणि तत्त्वज्ञान अशा चतुर्विध दृष्टीने असलेले महत्त्व त्यांनी प्रथमच सांगितले आहे. 'लीळाचरित्रा'च्या निर्मितीचा इतिहास, संहितेची अवस्थांतरे, महानुभावांच्या हस्तलिखितांची पद्धती व वेगळेपण, म्हाइंभटांचे चरित्र, लीळाचरित्राचा आशय, त्यातून व्यक्त होणारे श्रीचक्रधरांचे संपन्न व्यक्तिमत्त्व, तत्कालीन समाजजीवनाच्या अंगोपांगांचे घडणारे दर्शन, म्हाइंभटांची निरूपणपद्धती, कथनपद्धती आणि वर्णने अशा विविध विषयांचा त्यांनी साक्षेपाने आणि मर्मग्राही रसिकत्वाने प्रथमच शोध घेतला. 'लीळाचरित्रा'ची जी संपादने पुढे झाली, त्यावर ह. ना. नेने यांच्या संपादनाचा, आकलनाचा आणि विवेचनाचा मोठाच प्रभाव आहे.

**डॉ. शं. गो. तुळपुळे प्रत**

या प्रभावाची निशाणी म्हणून डॉ. शं. गो. तुळपुळे[४] यांनी संपादित केलेल्या पंचखंडात्मक लीळाचरित्राकडे (इ.स. १९६४ ते १९६७) बोट दाखविता येईल. आपल्या निवेदनात ते लिहितात –

> 'एकांक' व 'पूर्वार्ध' याप्रमाणेच 'उत्तरार्धा'चे संपादन करतानाही श्री. नेने यांचा पाठ वापरला आहे. मात्र त्यांच्या आवृत्तीतील वासनाभेद व पाठभेद मूळ संहितेत न देता ते खाली तळटीपांतून दिले आहे (त.) तसेच त्यांनी दिलेले सर्वच वासनाभेद न देता आशयाच्या किंवा आविष्काराच्या दृष्टीने महत्त्वाचे वाटले तेवढेच दिले आहेत.

एक पाठ (नेने-पाठ) कारणमीमांसेशिवाय स्वीकारणे हेच डॉ. शं. गो. तुळपुळे यांच्या संपादनाचे स्वरूप आहे. त्यामुळे त्यांचे संपादन हेही ज्ञेयनिष्ठ किंवा विशिष्ट वस्तुनिष्ठ पद्धतीचे संपादन ठरते. पाठभेद त्यांनी सजावटी-पुरतेच दिले असून त्यांचे एका परीने सुलभीकरण केले आहे. त्यामुळे या संपादनाच्या प्रामाण्याची चिकित्सा करता येत नाही.

अर्थस्पष्टीकरणात्मक टीपा, 'स्थानपोथी'तील संबंधित उतारे, व्यक्ती, स्थळे व देवता यांच्या नावांच्या सूची, शब्दकोश व संबद्ध स्थळांचा नकाशा देऊन त्यांनी आपली आवृत्ती अभ्यासकांना शक्य तेवढी उपयुक्त करण्याचा प्रयत्न केला आहे. 'लीळाचरित्रा' रूढ पोथ्यांतून न आढळणाऱ्या चार लीळांचे 'शेवटचे प्रकरण' परिशिष्ट








१ मध्ये महंत मुरलीधरशास्त्री आराध्य यांच्याकडील शके १६२५ च्या पोथीतून उद्धृत केले आहे.

'लीळाचरित्रा'च्या प्रत्येक भागास डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी विस्तृत प्रस्तावना लिहिल्या आहेत. लीळाचरित्राचे महत्त्व, लीळाचरित्राची बांधणी व रचना, लीळाचरित्राचा इतिहास, लीळाचरित्राचे निरनिराळे पाठ, लीळाचरित्राचा रचनाकाळ व कर्तृत्व, लीळाचरित्रकार म्हाइंभट, म्हाइं-भटांची ग्रंथरचना ह्यांविषयीचे विवेचन प्रत्येक भागात सारखेच दिलेले आहे. पुढे त्या त्या भागातील आशयाचे स्वरूप, श्रीचक्रधरांशी संबंधित असलेल्या प्रश्नांची चर्चा केली आहे. त्यात त्यांची गुरुपरंपरा, भ्रमण, अखेरचे प्रकरण हे असे काही प्रश्न आहेत. त्यातील इतिहास, समाजजीवन आणि तत्त्वज्ञान यांचे विवरण त्यांनी बारकाईचे संदर्भ शोधून विस्ताराने केले आहे. कालनिर्णय व स्थान-संदर्भ लक्षात घेतले आहेत. लीळाचरित्रातून घडणारे श्रीचक्रधरांच्या व्यक्तिमत्त्वाचे दर्शन त्यांनी संदर्भपूर्वक घेतले आहे. स्वामींच्या परिवारातील भक्तजनांची नाना-परीची व्यक्तिचित्रे टिपली आहेत. लीळाचरित्राच्या भाषेचा अनेकांगी विचार केला आहे. त्यात शब्दसंग्रह, शब्दसिद्धीचे प्रकार, सुभाषितपर रचना, वाक्यप्रचारवैभव, म्हणी, दृष्टान्तपद्धती असा बहुविध विचार आलेला आहे.

एकूण ह. ना. नेने यांनी दिलेल्या संहितेचा स्वीकार, नेने यांनी आरंभ केलेल्या लीळाचरित्रविषयक निरनिराळ्या मुद्द्यांचा त्याच पद्धतीने केलेला परामर्श पाहता डॉ. तुळपुळे यांच्या संपादनावरील ह. ना. नेने यांचे ऋण ठसठशीतपणे जाणवते. त्यामुळेच डॉ. तुळपुळे यांनी 'एकांका'चे संपादन ह. ना. नेने यांना अर्पण केले असावे. नेने यांच्या विवेचनाला डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी अधिक बारकाईने शोधलेल्या संदर्भांची व तपशीलाची जोड दिली. त्यांच्या एकूण लिखाणातच शिस्तबद्धता व व्यवस्थापन-कुशलता असल्याने विद्यार्थी-अभ्यासकांना तुळपुळे-प्रत अधिक सुबोध व उपयुक्त वाटते.

ह. ना. नेने यांच्याप्रमाणेच डॉ. शं. गो. तुळपुळे यांचे संपादनही स्वीकृत पाठाला प्रमाण मानणारे आहे. त्यामुळे ही दोन्ही संपादने 'ज्ञेयनिष्ठ' किंवा 'विशिष्ट वस्तुनिष्ठ' पद्धतीची संपादने ठरतात.

**डॉ. वि. भि. कोलते प्रत**

नेने व तुळपुळे यांची संपादने उपयुक्त असली, तरी ती शास्त्रीय नाहीत. त्यामुळे संहिताचिकित्साशास्त्राच्या दृष्टीतून लीळाचरित्राची चिकित्सक प्रत सिद्ध करण्याचा एक मोठा प्रयत्न डॉ. वि. भि. कोलते यांनी केला. 'लीळाचरित्रा'च्या चार शोधनी झाल्या, तरी पहिल्या शोधनीचा, म्हणजे म्हांइंभटांनी सिद्ध केलेला ग्रंथ, पुन्हा पूर्णरूपात सिद्ध झाला नाही. खंडित स्वरूपातच त्याचे पुनर्लेखन झाले. सूत्रे, दृष्टान्त, प्रकरणवश, सैह्याद्रिचरित्रे, द्वापरचरित्रे, द्वारावती चरित्रे, अज्ञात चरित्रे हेही 'लीळा-चरित्रा'च्या आदिसंहितेचेच भाग होते. पण ते सुट्या-सुट्या रूपांत वेगळे केल्याने 'लीळाचरित्रा'ची संहिता ह्यांच्याशिवाय पुनर्लिखित होत होती. तेव्हा या सर्वांची यथास्थानी पुनःस्थापना करण्याचा कोलते-प्रतीचा महत्त्वा-कांक्षी प्रयत्न आहे.

संपादनासाठी डॉ. वि. भि. कोलते यांना 'लीळा-चरित्रा'च्या एकूण पंचवीस पोथ्या उपलब्ध झाल्या. त्यांपैकी काही शके १६०० (इ.स.१६७८) नंतरच्या होत्या. पूर्वा-र्धाच्या अ, रा, भ, पं आणि उत्तरार्धाच्या अ, य, गो, मु या पोथ्या मात्र शके १५०० च्या (इ.स. १५७८) आत-मधल्या होत्या. ह्यांचाच मुख्य आधार घेतला. शके १५०० (इ.स. १५७८) नंतरच्या पोथ्यांचा अपरिहार्य परिस्थितीत आणि अपवादात्मक प्रसंगीच काय तो आधार घेतला. आ, ना या अशा प्रकारच्या पोथ्या आहेत. या पोथ्यांचे तपशीलवार वर्णन डॉ. कोलते यांनी दिले आहे.

सैह्याद्र लीळा, द्वारावती लीळा, अज्ञात चरित्रे यांचे व्यवस्थापन त्यांनी पोथ्यांच्या आधारावर तारतम्याने केले आहे. 'प्रकरणवशा'च्या आधाराने वचनांचे पुनःस्थापन केले. त्यात निर्देशिलेले प्रकरण 'लीळाचरित्रा'त असेल, तर त्यात ते वचन बसविले आहे; नसेल तर 'प्रकरणवशा'त दिलेल्या प्रकरणाची स्वतंत्र लीळा दिली आहे. 'प्रकरण-वशा'त काही वचनांचे एकापेक्षा अधिक प्रकरणवश आहेत. अशा वेळी डॉ. कोलते यांनीही ते अधिक ठिकाणी पुनःस्थापित केले आहे. 'दृष्टांतस्थळा'च्या आधाराने दृष्टान्तांचे पुनःस्थापन केले आहे. निर्दिष्ट प्रकरणे विद्यमान 'लीळाचरित्रा'त नसतील तर त्यांच्या स्वतंत्र लीळा तयार करून संहितेत अंतर्भूत केल्या आहेत.

अनुक्रमणिका






'लीळाचरित्रा'च्या वेगवेगळया पोथ्यांमध्ये लीळांची संख्या कमी-जास्त दिसते. त्यात काही लीळांचे एकत्रीकरण केलेले दिसते, तर काही लीळांच्या दोन-तीन लीळा केलेल्या दिसतात. तेव्हा डॉ. कोलते यांनी लीळांच्या संख्येचा प्रश्न गौण मानला आणि कोणत्या लीळा आहेत, ते पाहणे महत्त्वाचे मानले. लीळांचे स्थळ व त्यांचा काळ यांमधील संगती साधण्यासाठी त्यांनी योग्य प्रकारे लीळांचे व्यवस्थापन केले आहे. अशा प्रकारे एकूण १४२५ लीळांच्या शोधनीचे, निश्चितीचे आणि व्यवस्थापनाचे हे काम होते. ते डॉ. वि. भि. कोलते यांनी अतिशय साक्षेपाने तडीस नेले.

'लीळाचरित्रा'च्या प्रमाण पोथीतील लीळा छापताना तळटीपांत नमूद करून पाठांतरे छापलेली आहेत. मुळातील मजकूर नेहमीच्या सरळ अक्षरांत छापला आहे. मूळ प्रमाण पाठात नसलेला मजकूर एकतर तिरप्या अक्षरांत दिला आहे किंवा तो चौकटी कंसात घातला आहे. अन्य प्रतींतून घेतलेल्या लीळा तारकांकित केल्या आहेत. मूळ प्रमाण पाठ आणि संपादकीय संस्करण सुस्पष्टपणे लक्षात यावे अशाच पद्धतीने या चिकित्सक प्रतीचे मुद्रण केले आहे.

विस्तृत अनुक्रमणिका (पृ. ११ ते ५१), संक्षेप (५३ ते ५५), प्रस्तावना (पृ. ५७ ते ११५), संहिता (पृ. १ ते ७९४), परिशिष्टे : १. पुरवणी (७९५), २. व्यक्तिसूची (७९६ ते ८०६) ३. स्थानसूची (पृ. ८०७ ते ८१७), ४. दृष्टान्तसूची (पृ. ८१८-८१९) ५. प्रसूत्रसूची (पृ. ८२० ते ८४२), ६. शब्दकोश (पृ.८४३ ते ९३१) ७. शुद्धिपत्र (पृ. ९३३ ते ९३५) अशा अनेक अंगोपांगांनी हे संपादन संपन्न आहे.

आपल्या प्रस्तावनेत (पृ. ५७ ते ११५) डॉ. वि. भि. कोलते यांनी काही मुद्द्यांचा खुलासा केला आहे. 'लीळाचरित्रा'चे महत्त्व, ग्रंथनिर्मितीचा इतिहास, संपादनातील अडचणी, संपादनासाठी वापरलेली सामग्री व संपादनाचे धोरण, म्हाइंभटांचे चरित्र व ग्रंथकर्तृत्व आणि श्रीचक्रधरचरित्र देऊन त्यांनी ग्रंथाच्या आकलनासाठी सुयोग्य पार्श्वभूमी निर्माण केली आहे.

पूर्वग्रह आणि सांप्रदायिक अभिनिवेश टाळून डॉ. वि. भि. कोलते यांनी सिद्ध केलेली ही 'लीळाचरित्रा'ची चिकित्सक प्रत इ.स. १९७८ मध्ये प्रसिद्ध झाली. काही व्यावहारिक कारणांनी त्याविषयी सुरू झालेला वाद लवकरच श्रद्धाभावाच्या भावनिक वादळात रूपांतरित झाला. त्याच्या पुन:प्रकाशनाला स्थगिती मिळावी म्हणून न्यायालयात दाद मागण्यात आली. न्यायालयाने स्थगिती देण्याचे अमान्य केले. त्यामुळे काही किरकोळ दुरुस्त्यांसह त्याची दुसरी आवृत्ती इ.स. १९८२ ला प्रकाशित होऊ शकली. अवयवच्छेद, शेवटचे प्रकरण यांसारख्या लीळा काही महानुभावांच्या दृष्टीने अप्रमाण व क्षेपक होत्या. तर सीता, विठ्ठल व ज्ञानदेवांसंबंधीच्या लीळा महानुभावेतरांच्या क्रोधाला कारणीभूत झाल्या. त्याचा परिणाम म्हणून स्थगत आदेश देण्यात आला आणि मागणी असूनही कोलते-प्रतीची तिसरी आवृत्ती निघू शकली नाही. याविषयीचा सविस्तर इतिहास नागपूरच्या महानुभाव मंडळाने विचारमंथन १९९१, १९९२ व १९९३ या तीन ग्रंथांतून प्रसिद्ध केला आहे. कोलते-प्रतीतील दोषस्थळांविषयी डॉ. म. रा. जोशी, यांनी 'आलोचना' मासिकाच्या अंकांमधून आणि डॉ. सुरेश डोळके यांनी 'संशोधनसमस्या' (नागपूर, १९९०) या ग्रंथातून लिहिले आहे. विदर्भातील महानुभाव महंतांनीही त्यावर टीकेची झोड उठविली. डॉ. कोलते यांनी आपल्या परीने त्याचा प्रतिवाद केला आहे. महंत नागराजबाबा, महंत गोपीराजबाबा यांनीही कोलते-प्रतीचे समर्थन केले आहे. अशा तऱ्हेची चर्चा-चिकित्सा अवश्य झाली पाहिजे. तथापि त्यामागे सत्यशोधनाची असोशी असावी. व्यक्तिगत कारणे, अतिरेकी श्रद्धाभाव किंवा स्वमताविषयीचा अभिनिवेश नसावा. डॉ. वि. भि. कोलते यांच्यासारख्या ज्ञानतपस्व्याने परिश्रमाने, साक्षेपाने व वस्तुनिष्ठ वृत्तीने 'लीळाचरित्रा'च्या चिकित्सक आवृत्तीच्या निमित्ताने महानुभाव पंथ व वाङ्मय यांच्याविषयीचे एक महत्त्वाचे संशोधन-साधन आपल्या हाती दिले होते. ते मात्र या वादविवादामुळे दृष्टिआड होऊ पाहत आहे, ही खेदाची बाब आहे.

**महंत लासूरकर प्रत**

'लीळाचरित्रा'च्या कोलते-प्रतीमुळे शेवटच्या प्रकरणाविषयीचा वाद ऐरणीवर आला. त्या संदर्भात महन्त लासूरकर[६] यांनी 'लीळाचरित्र' उत्तरार्ध भाग दुसरा हे आपले संपादन समोर ठेवले. या संपादनाची जी प्रत

माझ्या हाती श्रीराजधरदादा आराध्ये यांनी आणून दिली, तीत समर्पण व गुरुजनांच्या छायाचित्रांचे एक पृष्ठ पाठपोट असून पुढे १ ते ७६ पृष्ठे निव्वळ संहिता दिलेली आहे. त्यात 'उत्तरार्धा'च्या अखेरच्या १९० लीळा क्र. १ ते १९० असे स्वतंत्र क्रमांक टाकून दिलेल्या आहेत. ही संहिता ७६ पृष्ठांची आहे. शेवटचे प्रकरण वादग्रस्त ठरले. तेव्हा संग्रही असलेली पोथी महन्त लासूरकरांनी आपल्यासमोर ठेवली. या पोथीत शेवटचे प्रकरण नाही. ही पोथी पारिमांडल्य प्रकाशन, परभणी (इ.स.१९९२) यांनी प्रसिद्ध केली आहे. तथापि ती पारिमांडल्य-पाठाची आहे की नाही, याविषयी स्पष्ट विधान करता येत नाही. याचे कारण असे, की त्याविषयीचे कोणतेही निवेदन सोबत जोडलेले नाही. कदाचित मला उपलब्ध झालेल्या प्रतीत संपादक किंवा प्रकाशक यांचे निवेदन फाटलेले असावे. त्यामुळे या प्रतीस 'संशोधित सुधारित प्रथमावृत्ती' का म्हटले असावे, संहितेत काही मजकूर कंसगत आहे तो का, या संपादनाचे आणखी काही भाग किंवा आवृत्त्या आहेत काय, याविषयी येथे काहीच सांगता येत नाही.

**नागपूर प्रत- नरेंद्रमुनी अंकुळनेरकर, विद्याधरदादा पंजाबी व इतर**

कोलते-प्रतीला विरोध केल्यामुळे 'लीळाचरित्रा'ची पर्यायी प्रत देण्याची जबाबदारी ओघानेच नागपूरच्या महानुभाव मंडळावर आली. ती त्यांनी यथाशक्ति निभावली. या दृष्टीने 'म्हाइंभट संकलित लीळाचरित्र' ही नरेंद्र मुनी अंकुळनेरकर यांनी विद्याधरदादा पंजाबी आणि इतर तेवीस महानुभाव पंडित व महंत यांच्या सहकार्याने सिद्ध केलेली प्रत[७] (इ.स. १९९३) पाहता येईल.

ही प्रत पंचवीस महंत व पंडित यांच्या स्वाक्षऱ्यांसह प्रसिद्ध झाली. प्रकाशकीय (पृ.१-२), निवेदन (३ ते ६), आभार (७-८), अनुक्रमणिका (१-३२), प्रस्तावना (३३-३४), उपोद्घात (३५-९२), संक्षेप (९३-९४), मूळपीठिकेत महानुभाव इतिहास प्रकरणाचा भीष्माचार्य पाठ (९५ ते ९८), आचार्यभाषित इतिहास-कथन अमृतें माइदेवो रामदेवो संवादु (९८ ते १००), त्रयोदश पाठांचा विवर्ण गुढां (१०० ते १०२), संहिता (१ ते ८३२), परिशिष्टे स्थान परिचय (८३३ ते ८३८), तीर्थस्थान परिचय (८३९ ते ९१२), व्यक्तिसूची (९१३ ते ९३४), सूत्रसूत्री (९३५ ते ९६२), शब्दकोश (९६३ ते १०२९), पूर्वार्धातील अधिकच्या लीळा (पृ. १०३०-१०३१), शुद्धिपत्र (१०३२ ते १०४८), अनुदान देणाऱ्यांची नावे (१०४९ ते १०७४) अशी या प्रतीची मांडणी आहे. काही तीर्थस्थानांची छायाचित्रे आणि काही पोथ्यांच्या पृष्ठांच्या छायाप्रतीही दिल्या आहेत. या प्रतीचे स्वागत करणाऱ्या छपन्न महंतांच्या स्वाक्षऱ्याही आहेत. ज्याला सांप्रदायिक संपादन म्हणता येईल, अशाच प्रकारचे हे संपादन आहे.

या सांप्रदायिक संपादनाचा जन्म उपलब्ध संपादनांविषयीच्या असामाधानातून झालेला आहे. श्री. ह. ना. नेने, डॉ. शं. गो. तुळपुळे आणि डॉ. वि. भि. कोलते हे तिघेही महानुभावांचे मान्यवर अभ्यासक होते. तथापि ते स्वतः महानुभाव संप्रदायाचे अनुयायी नव्हते. अशा पंथीयेतरांना संपादनासाठी 'लीळाचरित्रा'च्या पुष्कळशा पोथ्या मिळू शकत नाहीत. त्यामुळे बऱ्याचशा लीळा त्यांच्या संपादनात अंतर्भूत होऊ शकत नाहीत. भाविक अशा लीळांपासून वंचित राहतात. याउलट, प्रमाणपाठात नसलेल्या काही लीळा त्यांच्या संपादनात अंतर्भूत होतात. त्यांच्या संपादनातील काही लीळांचा पंथीय आचार-विचारांशी सुतराम संबंध नसतो. खरेतर कोणत्याही धर्मग्रंथाचे संशोधन व संपादन त्या धर्मातील अधिकारी व्यक्तींकडून व्हावे या धारणेने महानुभाव मंडळाने पंथीय परंपरेला मान्य असलेली आवृत्ती प्रकाशित केली.

मुरारिमल्लव्यास विद्वांस यांची चतुर्थ शोधनी ही मूळ प्रत संपादनासाठी स्वीकारण्यात आली. चारशे-साडेचारशे वर्षांपूर्वीच्या सुमारे एकावन्न पोथ्या उपलब्ध झाल्या. त्यांत मुरारिमल्ल पाठाच्या कालनिर्देश असणाऱ्या पाच पोथ्या व कालनिर्देश नसणाऱ्या चौदा पोथ्या होत्या. शके १५३७ (इ.स.१६१५) व शके १५३९ (इ.स.१६१७) यांसारख्या या पाठाच्या एवढ्या जुन्या पोथ्या आजवर कोणालाही उपलब्ध झालेल्या नव्हत्या. यांपैकी शके १५३९ (इ.स.१६१७) ही मु प्रत प्रमाण मानून संहिता दिली आहे. द्वारावतीकार चरित्राच्या दहा लीळा श्री प्रतीवरून दिलेल्या आहेत. संपादकांना बऱ्याच उशिरा सा ही प्राचीनतम प्रत (शके १४४४ इ.स.१५२२) मिळाली. त्यामुळे तिचा उपयोग तळटीपांसाठी तेवढा

करता आला. एकूण ३३ पोथ्या पाठभेद देण्यासाठी वापरल्या. मु प्रतीत पूर्वार्ध (६२३ अशी नोंद पण प्रत्यक्षात ६२६), उत्तरार्ध (६९५), श्रीकृष्णचरित्र (४८), श्रीदत्तात्रेय चरित्रे (७), अज्ञात चरित्रे (१३५) अशी लीळासंख्या आहे. त्यात श्रीद्वारावतीकार लीळाचरित्राच्या १० लीळा श्री प्रतीतून उद्धृत केल्या आहेत.

लीळाचरित्र हा १२३८ सूत्रे व ११४ दृष्टांत यांनी संपन्न ग्रंथ आहे. पण विद्वांस पाठात फक्त २८५ सूत्रे व २६ दृष्टान्तच आहेत. तेव्हा संपादित प्रतीत ९५३ सूत्रे व ८८ दृष्टान्त यांचे प्रकरणवशासह पुनःस्थापन करावे लागले.

सामान्य वाचकाची आकलनक्षमता लक्षात घेऊन संपादकांनी काही मुद्रणसंस्कार केले. मूळ पाठ मोठ्या ठशात दिला. लहान ठशात त्या त्या व्यक्तीचे नाव कंसात देऊन वासनांची नोंद केली. मूळपाठाशी मतभेद दर्शविणारा मजकूर चिन्हांकित करून कंसात बारीक अक्षरात टाकला. लीळेतील वाक्ये मागे-पुढे करून क्लिष्टता टाळण्याचा प्रयत्न केला. संगतीसाठी कोठे जे शब्द घालावे लागले, ते तिरक्या टाइपात छापले. प्रत्येक लीळेचे महत्त्वाचे पाठभेद त्या त्या लीळेखाली नोंदविले. सूत्रे व दृष्टान्त जाड ठशात छापले. विरामचिन्हांचा–विशेषतः अवतरण-चिन्हांचा–यथास्थानी वापर केला. एकूण क्लिष्टता टाळावी, वाचणे सुकर व्हावे आणि पाठांची यथास्थितीही राखावी, असे धोरण सांभाळून संपादकांनी मुद्रणसंस्कार केले आहेत.

पोथ्यांचे संकलन, लिप्यंतर, वाचन, पाठभेदांची नोंदणी, सूत्रे-दृष्टान्त यांचे पुनःस्थापन, प्रमाणप्रतीची सकारण निश्चिती करून पुष्कळशा शास्त्रीय पद्धतीने श्रीमुरारिमल्ल विद्वांस यांच्या चतुर्थ शोधनीचा पाठ संपादकांनी या 'लीळाचरित्रा'च्या आधारे आपल्यासमोर ठेवला आहे. सांप्रदायिक संपादनामागची भूमिका, लीळाचरित्राचे माहात्म्य यांची चर्चा नेटकेपणाने केली. चरित्रनायक श्रीचक्रधर, चरित्रकार श्रीम्हाइंभट आणि शोधनीकार श्रीमुरारिमल्ल विद्वांस यांच्या जीवनकार्याचा व लेखन-कर्तृत्वाचा परिचयही त्यांनी करून दिला आहे.

**'स्मरणपाठ' – देवदत्त आश्रम प्रत**

आपले संपादन शास्त्रीय पद्धतीचे व्हावे, याविषयी महंत श्रीनरेंद्र मुनी अंकुळनेरकर आणि महंत विद्याधरदादा पंजाबी या संपादकद्वयाने पुष्कळशी काळजी घेतली आहे. तथापि हा साक्षेप श्रीनरेंद्रमुनी अंकुळनेरकर यांच्याच मार्गदर्शनाने श्रीदेवदत्त आश्रमस्थ शिष्यवृंदाने सिद्ध केलेल्या प्रतीत दिसत नाही. 'आद्य मराठी ग्रंथ लीळाचरित्र (स्मरण-पाठ)'[८] असे हे संपादन पिढीपाठ, पंडित हिराई पाठ, उपाध्ये हिराई पाठ, नागनाथ पाठ, चतुर्थ शोधनीचा पिढीपाठ आणि इतर अनेक चरित्र-कुसुमांचा समुच्चय आहे. त्यामुळे त्याची लीळासंख्या बेसुमार फुगलेली आहे.

"या चरित्रपाठातील मूळ विवेचन, वासनाभेद वा पाठांतरे किंवा संपादकांच्या तळटीपा यांतून आशय आकलन होणे सर्वसामान्य भक्तांसाठी दुष्कर असते. ही अडचण दूर व्हावी म्हणून प्रस्तुत स्मरणपाठाची निर्मिती झाली आहे. ... आवश्यक ठिकाणी संपादकांची 'अक्षरे' तिरक्या वळणात दिली आहेत." (कानमातणे पृ.१३-१४). अशा प्रकारे जिज्ञासूंपेक्षा भाविकांसाठी प्रत सिद्ध करण्याचे संपादकांचे धोरण आहे. लीळाचरित्राची पूर्वपीठिका (पृ. ९ ते १२) कळावी म्हणून इतिहासप्रकरणातील काही भाग आरंभी दिला आहे. कानमातणे (पृ. १३-१४), अनुक्रमणिका (पृ. १५ ते ९२), संहिता (पृ. ९७ ते १२२६), परिशिष्टे म्हणून स्थळसूची (पृ. १२२७ ते १२४२), व्यक्तिसूची (पृ. १२४३ ते १२५७), दृष्टान्त-सूची, सूत्रसूची (पृ. १२६२ ते १३०७), शब्दसूची (पृ. १३०८ ते १४३०), तत्त्वज्ञानपर उतारे (पृ. १४३१ ते १४३५) अशी या 'स्मरणपाठा'ची मांडणी आहे. आरंभी गुरुजनांची, आचार्यांची छायाचित्रे आहेत. 'रत्नमाला-स्तोत्रा'तील मंगलाचरण, 'मूर्तिप्रकाशा'तील नागदेव यास नमन आणि 'ज्ञानप्रबोधा'तील म्हाइंभटनमन (पृ. ९३ ते ९६) संहितेच्या आरंभी उद्धृत केले आहे.

आपल्या हस्तलिखित सामग्रीचे शास्त्रीय वर्णन आणि त्यांचा उपयोग करण्याची पद्धती याविषयी संपादकांनी अवाक्षरही लिहिलेले नाही. संपादकांनी अनेक पाठांचा हवाला दिलेला असला, तरी कोणती लीळा कोणत्या पाठातून घेतली याचा खुलासा केलेला नाही. परस्परांशी कुलसंबंध नसलेल्या वेगवेगळ्या प्रतींमधील पाठांतरांची निवड करून अशी प्रत तयार केली जाते. या निवडीमागे विशिष्ट तत्त्व किंवा निवडीची एखादी पद्धती नसते.

संपादकांची वैयक्तिक दृष्टी येथे प्रबळ आणि निर्णायक असते. संहिताचिकित्साशास्त्रात अशा आवृत्तीला सार-संग्राहक आवृत्ती (इक्लेक्टिक) म्हणतात.

'लीळाचरित्रा'चा 'स्मरणपाठ' स्मरणीय किती?'[९] या अभ्यासपूर्ण लेखात महंत गोपीराजबाबा शास्त्री यांनी या प्रतीवर काही गंभीर आक्षेप नोंदविले आहेत. पूर्वार्ध लीळा क्र. २९०, ३१०, ३११, ५२७, ५२६, ५३६, ५३७ मध्ये ज्या स्थानांचा उल्लेख आलेला आहे, त्यांचा पिढीपाठ, मुरारिमल्लपाठ, स्थानपोथी, तीर्थमालिका इत्यादी प्रमाणोक्त ग्रंथांमध्ये कोठेही उल्लेख नाही. जेथे स्वामी एकदा गेलेले होते, अशा स्थानी ते दोन-तीन-चार वेळा गेल्याची सतरा उदाहरणे त्यांनी 'स्मरणपाठा'तून नोंदविली आहेत. आणि 'हे नवसृजन नव्हे काय?' असा प्रश्न विचारला आहे.

नागपूर-प्रत आणि स्मरणपाठ या दोन्हीचे संपादक एकच आहेत. असे असूनही काही लीळांची शीर्षके बदललेली दिसतात. नागपूर प्रतीच्या पूर्वार्ध लीळा क्र. ८६, ८८ या स्मरणपाठाच्या पूर्वार्ध लीळा क्र. १०९ व १११ म्हणून देताना त्यांची शीर्षके बदललेली आहेत. रामदेवांसाठी 'देव' या शब्दाचा वापर नागपूर प्रतीत आहे तर स्मरणपाठात मात्र त्यांच्यासाठी 'दादोस' असा शब्द वापरला आहे.

आक्षेपार्ह लीळा वगळण्याचे स्मरणपाठाचे धोरण दिसते; पण त्यातही संगती नाही. विक्षेपी लीळा वगळणाऱ्या मुरारिमल्लबासांनी आडसेच्या नग्ननृत्या-विषयीच्या चार लीळा आपल्या चरित्रपाठात समाविष्ट केल्या आणि त्यावर भाष्यही केले आहे. तथापि स्मरणपाठ-कारांनी त्या वगळल्या आहेत. खरंतर उत्तरार्ध क्र. ३९, ९३, ४१३ या लीळाही त्याच न्यायाने वगळणे योग्य झाले असते पण त्यांनी तसे केलेले नाही. उत्तरार्ध लीळा १८० 'भटबाईसा परमप्रीति' ही लीळा अशीच अविहित असल्याने आक्षेपार्ह आहे. नागपूर प्रतीत उत्तरार्ध क्र. १३० या लीळेच्या तळटीपेत ही लीळा दिलेली आहे. स्मरणपाठकारांनी मात्र ती संहितेत समाविष्ट केली आहे.

एकूण, 'स्मरणपाठ' ही प्रत पुरेशा काटेकोरपणे सिद्ध झालेली दिसत नाही. 'स्मरणपाठ' ही सांप्रदायिक कोमळ भक्तजनांसाठी 'लीळाचरित्रा'ची समावेशक आणि सुबोध मांडणी करणारी प्रत आहे.

**माधवराज पंजाबी प्रत**

त्या मानाने श्री. माधवराज पंजाबी[१०] यांनी संपादित केलेले 'म्हाइम भट संकलीत चतुर्थ शोधनीचा पिढीपाठ सर्वज्ञाचे लिळाचरित्र' अधिक साक्षेपाने सिद्ध केलेले आहे. हे संपादन चतुर्थ शोधनीचा पिढीपाठ समोर ठेवणारे आहे. वीस वर्षांपूर्वी नकल करून ठेवलेली पोथी छापता आल्याबद्दल संपादकांनी धन्यता व्यक्त केली आहे. पण या पोथीविषयीचा विशेष तपशील त्यांनी नोंदविलेला नाही. या प्रतीसारखा मजकूर असलेल्या चार पोथ्या पाहून त्यांनी स्वतःजवळ असलेल्या पोथीवरून पाठ दिला आहे.

आचार्य श्रीमुरारिमल्ल विद्वांसांचे मुखत्यारपत्र व नंतरच्या पिढीचे वाटणीपत्र (पृ. ४ ते ९), प्रकाशकीय निवेदन (पृ. १० ते १६), संहिता (पृ. १ ते ७४३), परिशिष्टे म्हणून लीळाचरित्रात येणाऱ्या व्यक्तींचे नातेसंबंध (पृ. ७४४ ते ७५९) आणि शब्दकोश (पृ. ७६० ते ८४६) दिले आहेत. या प्रतीचे मुखपृष्ठ श्रीम्हाइंभटांचे व्यक्तिमत्त्व सुचविणारे आणि गौरव करणारे आहे. मुखपृष्ठाची ही कल्पना महंत पाथरीकरबाबा यांची आहे. 'लीळाचरित्रा'तील व्यक्तींची सूची त्यांनी त्यांच्या नातेसंबंधां-सह दिलेली आहे. त्यामुळे सन्निधानी भक्तजनांचे नेमके आकलन होते. त्यांनी दिलेला शब्दकोशही विस्तृत आहे.

'प्रकाशकीय दोन शब्दां'त त्यांनी 'लीळाचरित्रा'चा इतिहास दिलेला आहे. चाळीस-पंचेचाळीसपासून ते एकोण-साठ-एक्क्याण्णवपर्यंत लीळाचरित्राचे वेगवेगळे खरडे झाले, अशी त्यांनी दिलेली संख्या लक्ष वेधून घेणारी आहे. कोलते-प्रतीत खोडतोड व भेसळ झालेली आहे, लीळांचा अनुक्रम मोडला, असा त्यांचा आक्षेप आहे. श्रीमुरारिमल्ल विद्वांस यांच्या शोधनीचे प्रामाण्य त्यांनी इतिहासासह मांडले आहे. अशा प्रक्षिप्त पाठांचे निराकरण करण्यासाठी श्रीमुरारिमल्ल विद्वांस यांनी 'लीळाचरित्रा'ची चौथी शोधनी केली. क्षेपक, अविहित आणि विक्षेपरूप लीळा गाळून त्यांनी गुजर शिवबासाच्या पिढीपाठाचे संशोधन केले. हेतुस्थळातील हेतू या चरित्रपाठाप्रमाणे बरोबर लागतात. त्यामुळे "…. मुरारिमल्लबास लिखित लीळाचरित्राचा पाठ हाच प्रमाणित पाठ होय." (पृ. १६)








या धारणेने त्यांनी त्याची आपल्या जवळची पोथी वाचकांसमोर ठेवली आहे. स्वीकृत संहिता यथामूल देणारे हे ज्ञेयनिष्ठ संपादन आहे.

**प्रा. पुरुषोत्तम नागपुरे प्रत (इ.स.२००४)**

प्रा. पुरुषोत्तम नागपुरे हे अंकुळनेरकर-पंजाबी प्रतीचे एक सहकारी संपादक होते. नंतर मात्र त्यांनी "लीळाचरित्र"[१] हे संपादन हिराइसा पाठाचे म्हणून स्वतंत्रपणे सादर केले. अनेक संत-महंतांचे ग्रंथपुरस्कार (पृ. ५ ते १५), संक्षेप (१६), दि. वि. बिडकरशास्त्री यांचे निवेदन (१७ ते १९), अशोक कामत यांची प्रस्तावना (२० ते २५), पुरुषोत्तम नागपुरे यांची अवतरणिका (२६ ते ८१), आभार (८२ ते ८४), लीळानुक्रम (८५ ते १००), संहिता (१ ते ७९७), परिशिष्टे – दृष्टान्तसूची (७९७ ते ७९८), मोकळे दृष्टान्त (७९८ ते ८११), सूत्रसूची (८११ ते ८२७), व्यक्तिसूची (८२८ ते ८३३), स्थानसूची (८३४ ते ८३९), शब्दकोश (८४० ते ८७३), देवतासूची (८७४-८७५), ग्रंथसूची (८७६ ते ८७८), संपादकांचा परिचय (८७९-८८०) अशी त्यांच्या संपादनाची मांडणी आहे.

नागपुरे प्रत 'लीळाचरित्रा'चा 'हिराइसे उपाध्ये शिष्ये कमळाउसाची' यांचा पाठ आपल्यासमोर ठेवल्याचा दावा करते. मूळ पाठ हरवल्यानंतरचा हाच पहिला पाठ असून तृतीय आचार्य भास्करभट्ट बोरीकर यांच्या साक्षीने तयार झालेला पाठ आहे. परसरामबास व गुर्जर शिवबास यांच्या शोधनीचाही हाच आधारपाठ आहे. त्यामुहे हिराइसापाठाला परंपरेत मान्यता आहे. महंत श्रीबिडकरशास्त्री महानुभाव, रणाइचे यांच्याकडून मिळालेली या पाठाची 'पूर्वार्ध' पोथी आणि महंत श्रीआराध्येबाबा महानुभाव, अमृतसर (भुसावळ) यांच्याकडून मिळालेल्या पोथीतील 'उत्तरार्ध' त्यांच्या पाठभेदांसह संपादकांनी दिले आहेत. हिराइसा हाच पहिला पाठ असल्याने कोणत्याही पाठपरंपरेत हिराइसा वासनेचा उल्लेख सापडतो. तसा उल्लेख या दोन्ही पोथ्यांमध्ये नाही. ही या पोथ्या हिराइसा पाठाच्या असल्याची खूण आहे. ही पोथी डॉ. वि. भि. कोलते यांनाही उपलब्ध झालेली होती. ती हिराइसे पाठाची असल्याचे त्यांनीही नमूद केले आहे. या आधारांवर "... आम्ही आज संपादित करीत असलेली हिराइसा पाठाची पोथी हीच अधिकृत व सर्वाद्य पिढीपाठाची पोथी आहे, हे उघड आहे" (पृ. ४१) असे संपादकांनी आग्रहपूर्वक सांगितले आहे.

हा हिराइसा पाठ देताना खंडित संहितेतील ११४ दृष्टान्त आणि १२४९ सूत्रे यांचे त्यात पुनःस्थापन करण्याचा संपादकांनी प्रयत्न केला आहे.

या आवृत्तीचे महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यात लीळांचा भावार्थ दिलेला आहे. त्यामुळे सर्वसाधारण वाचकाची मोठीच सोय झाली आहे. लीळांबरोबरच सूत्रे व दृष्टान्त यांचाही त्यामुळे अर्थबोध होतो.

".. ज्यामुळे चरित्रनायकाच्या चरित्रपरिपोषाची हानी होते, असे प्रक्षेप आणि विक्षेप केवळ आमच्या स्वान्तसुखाय वा कुणाच्या रागालोभासाठी यात येऊ नयेत, असा दृष्टिकोण सतत जोपासला. ती आमची बांधीलकी हिराइसा पाठाची चौकट पक्की ठेवून आम्ही जपली." (निवेदन पृ. १९). असेही मार्गदर्शकांनी म्हटले आहे. त्यावरून त्यांचीही भूमिका मुरारिमल्लबासांप्रमाणेच असल्याची दिसते. अभ्यासू, भाविक आणि वासनिक यांच्यासाठी आपले संपादन आहे, असे ते म्हणतात. त्यांनी दिलेल्या विविध प्रकारच्या सूची सर्वसाधारण वाचकाला उपयुक्त ठरणाऱ्या अशाच आहेत.

अवतरणिकेत संपादकांनी "लीळाचरित्रा"ची महती परोपरीने गायिली आहे. श्रीचक्रधरांच्या ठायी ईश्वरी अवताराची गुणसंपदा कशी विद्यमान होती, ते त्यांनी सोपपत्तिक व सोदाहरण दाखविले आहे. श्रीचक्रधरांचे आणि चरित्रकार म्हाइंभटांचे चरित्र त्यांनी विस्ताराने दिले आहे.

पुरुषोत्तम नागपुरे यांची प्रत महानुभाव परंपरेतील पहिला आणि प्रमाण असा हिराइसा पाठ सादर करणारी असल्याने महत्त्वाची ठरते. तथापि या पोथीवर शकाचा उल्लेख नाही. तसा तो असता तर तिची विश्वसनीयता अधिक वाढली असती.

हिराइसा पाठ देताना कोलते यांच्याप्रमाणेच नागपुरे यांनीही सूत्रे व दृष्टान्त यांचे पुनःस्थापन करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यात उत्तरार्धातील बेलापूर येथील लीळा पूर्वार्धात क्र. ४४ म्हणून दिली गेली आहे. अशीच हिवरळीची लीळा पूर्वार्ध क्र. ४० म्हणून दिली आहे. काही दृष्टान्तांचा प्रकरणवश बरोबर दिलेला नाही.








वर्तमान मराठीत लीळाचरित्राचा अर्थ देण्याचा संपादकांचा प्रयत्न हा एक महत्त्वाची गरज भागविणारा महत्त्वाकांक्षी प्रयत्न आहे. तथापि महंत श्री गोपीराजबाबांनी[१२] दाखविल्याप्रमाणे काही ठिकाणी हा भावार्थ विकल्पदोषजनित आहे. पुष्कळ ठिकाणी जुने दुर्बोध शब्द तसेच ठेवून भावार्थ दिला आहे. त्यामुळे साधारण वाचकास तो पुरेसा स्पष्ट होत नाही.

पुरुषोत्तम नागपुरे यांचे संपादन ज्ञेयनिष्ठ-म्हणजे स्वीकृत संहिता देणारे आहे. तथापि पुन:स्थापनाच्या प्रयत्नामुळे ते तितके ज्ञेयनिष्ठ राहू शकत नाही. लीळाचरित्राबरोबरच 'सूत्रपाठ' आणि 'दृष्टान्तपाठ' यांचाही भावार्थ यात ग्रथित झाल्यामुळे भाविकांची मोठी सोय झाली आहे, असे मात्र म्हणता येईल.

**विद्याधरदादा पंजाबी प्रत**

ई. श्री. विद्याधरदादा पंजाबी यांनी स्वतंत्रपणे हिराइसा पाठाचा भावार्थ देणारी प्रत[१३] प्रसिद्ध केली आहे. या भावार्थ संपादनात मूळ संहिता दिलेली नाही. ही प्रत या लेखाच्या लेखनकालावधीत मला उपलब्ध झाली नाही. त्यामुळे त्याचा परिचय करून न देता केवळ नोंद तेवढी येथे करीत आहे.

**'लीळाचरित्रा'च्या संपादनाविषयीचे काही प्रश्न**

महानुभाव पंथामध्ये प्रेमाबरोबर ज्ञान हेही धर्मसाधन म्हणून सुप्रतिष्ठित आहे. त्यामुळे आरंभापासून आजपर्यंत ज्ञानोपासक महानुभाव महंतांची अखंड परंपरा आढळून येते. या परंपरेतील विद्वान धर्मधुरीणांनी पंथमान्य अशी 'लीळाचरित्रा'ची संहिता सिद्ध करण्याचे वेगवेगळे प्रयत्न केले.

**विक्षेपी आणि क्षेपक लीळा**

महानुभावेतर अभ्यासकांच्या संपादनाविषयीच्या असमाधानातून या संपादनांचा जन्म झालेला आहे. डॉ. वि. भि. कोलतेसंपादित 'लीळाचरित्रा'ला जो विरोध झाला, तो आक्षेपार्ह व म्हणून क्षेपक अशा लीळांच्या समावेशामुळे. वस्तुत: सीता, विठ्ठल, ज्ञानदेव, आउसा यांविषयीच्या वादग्रस्त लीळा हिराइसा पाठ, गुर्जर शिवबास पाठ, मुरारिमल्ल पाठ अशा सर्व चरित्रपाठांत आहेत. ह. ना. नेने व डॉ. शं. गो. तुळपुळे यांच्या संपादित प्रतींमध्येही या लीळा आहेत. महंत नागराजबाबा म्हणतात त्याप्रमाणे, "मुरारिमलबासांनीच नव्हे तर त्याही पूर्वीच्या गुर्जर शिवबासांनी आणि त्याही पूर्वीच्या परसरामबासांनी तथा कवीश्वरबासांनी व त्यांची शिष्या नागाइसा यांनी आपल्या प्रमेयामध्ये शेवटच्या प्रकरणाचा उल्लेख केला आहे."[१४] या लीळा क्षेपक मानणारे महानुभाव आहेत त्याचप्रमाणे त्या लीळा सत्य आहेत, असे मानणारेही महानुभाव आहेत. महानुभावेतर अभ्यासकातही असे दोन पक्ष आहेत. याचा अर्थ असा की या लीळा संहितेत अंतर्भूत केल्या, तरी ती संहिता वादग्रस्त होईल आणि त्या वगळून संहिता दिली तरी ती संहिताही वादग्रस्तच होईल, हे आपण तटस्थपणे समजून घेतले पाहिजे.

या संदर्भात महानुभाव महंतांना आचार्य मुरारिमल्लबास विद्वांस यांच्या चतुर्थ शोधनीचा पाठ स्वीकार्य व अनुकरणीय वाटतो. त्यामुळे मुरारिमल्लपाठ देणारी दोन-तीन संपादने दिसतात. मुरारिमल्लांनी क्षेपक, अविहित आणि विक्षेपी लीळांना स्थान दिले नाही. 'क्षेपक' म्हणजे संहितेत नंतर घुसडून दिलेला भाग, टाकलेली अधिकची भर, प्रक्षिप्त भाग होय. असा भाग गाळून संहिता शुद्ध करणे हेच तर संपादकांचे खरे काम असते. 'अविहित' म्हणजे स्वामींच्या निरूपणाच्या, तत्त्वसरणीच्या, महानुभावांच्या आचार-विचाराशी संबंध नसलेल्या लीळा होत. तेव्हा क्षेपक व अविहित लीळा गाळणेच योग्य ठरते. तथापि विक्षेपी लीळांचा प्रश्न थोडा निराळा आहे. 'विक्षेपी लीळा' म्हणजे कोमल भक्तजनांच्या अंत:करणाला व्यथित करणाऱ्या, त्यांच्यात विपरीत भाव निर्माण करणाऱ्या लीळा होत. पंथीय श्रद्धाभावाला अनुसरूनच मुरारिमल्लबासांनी हे धोरण स्वीकारले असावे, याविषयी शंका नाही. चरित्रपाठात त्यांनी अशा विक्षेपी लीळा वगळल्या. असे असले तरी मुरारिमल्लबासांनी आपल्या इतर साहित्यात या लीळा, त्यांतील वाक्ये व संदर्भ यांचा मोकळेपणाने वापर केला आहे. महंत नागराजबाबांनी[१५] हे विस्ताराने व तपशिलासह दाखवून दिलेले आहे. त्यावरून स्वत: मुरारिमल्लबासांना या लीळा क्षेपक वाटत नव्हत्या; एवढेच काय, ते स्वत: जरठ अधिकारण असल्यामुळे त्यांना त्या विक्षेपीही वाटत नव्हत्या, हे उघड होते.

कोमलजनांना विक्षेप न येता चरित्राचे श्रवण-पठण








करता यावे म्हणून अशा लीळा गाळाव्यात, ही मुरारिमल्लबासांची भूमिका श्री. नरेंद्रमुनी अंकुळनेरकर, श्री. विद्याधरदादा पंजाबी, श्री. बिडकरशास्त्री, प्रा. पुरुषोत्तम नागपुरे इत्यादी संपादकांनी स्वीकारली आहे. प्रसंगी मुरारिमल्लबासांनी ज्या लीळांचा समावेश चरित्रपाठात केला आहे, अशा काही लीळा – उदाहरणार्थ, आउसेच्या नग्ननृत्याविषयीच्या चार लीळा – 'स्मरणपाठा'च्या संपादकांनी गाळलेल्या आहेत. असाच विचार करीत गेलो तर आणखीही लीळा कशा गाळाव्या लागतील, त्याचे दिग्दर्शन महंत गोपीराजशास्त्री महानुभाव[१६] यांनी केले आहे. कोमल भक्तांना कोणत्या लीळा विक्षेपी वाटतील, याचा अंदाज प्रत्येक संपादकाच्या अभिरुचीनुसार, भूमिकेनुसार वेगवेगळा असेल. या तऱ्हेचे व्यक्तिनिष्ठ वैयक्तिक निर्णय वेगवेगळे असतील. आणि त्यांचे काही वस्तुनिष्ठ निकष ठरविता येणार नाहीत. त्यामुळे असे प्रयत्न संहिताचिकित्साशास्त्राच्या परिघाबाहेर जाणारे ठरतात.

अशा तऱ्हेची गाळागाळ करताना काही वेळा गंभीर प्रमाद कसे घडतात, याचे एक लक्षवेधी उदाहरण महंत गोपीराजशास्त्री[१७] यांनी दिले आहे. श्रीमुरारिमल्लबासांनी 'शेवटचे प्रकरण' आणि त्याच्याशी संबंधित संदर्भ विक्षेपी लीळा म्हणून गाळल्या. तथापि त्यातील एक उल्लेख तसाच राहिला आहे. माधवराज पंजाबी प्रतीतील उत्तरार्ध लीळा क्र. ५८९ 'तथा नाम स्मरणाभीमाने प्रवृत्यंतर' या शीर्षकाने तो आला आहे. पुरुषोत्तम नागपुरे प्रतीतही उत्तरार्ध लीळा क्र. ६१२ 'नामस्मरण कथनः माहादाइसी जाप्यकरणी अनोज्ञा' या शीर्षकाखाली तो पूर्णपणे आला आहे. तथापि 'स्मरणपाठ' उत्तरार्ध लीळा क्र. ८६७ 'तथा नाम स्मरणाभिमाने प्रवृत्यंतर' या शीर्षकाने देताना स्वामींनी दिलेल्या कारणांपैकी एक गाळून दोनच कारणे दिली आहेत. नागपूर प्रतीतही उत्तरार्ध ६८० मध्ये अशीच गाळागाळ आहे. तोच प्रकार विद्याधरदादा पंजाबी यांच्या भावार्थप्रतीतही उत्तरार्ध लीळा क्र. ६६३ देतानाही अशीच गाळागाळ झालेली आहे. या संदर्भात "... ब्रह्मविद्याशास्त्रात स्वोक्तीचा वापर करून अन्यथा ज्ञानसंमिश्रणाची प्रक्रिया सुरू झाली आहे."[१८] असा सावधगिरीचा परखड इशारा महंत श्रीगोपीराजबाबा शास्त्री, रिद्धपूर यांनी दिला आहे तो चिंतनीय आहे.

विक्षेपी लीळा गाळण्याचे कारण आपण समजू शकतो. पण संहिताचिकित्साशास्त्राच्या कसोटीवर हा मुद्दा सत्यासत्यतेचा निर्णय करण्यास पुरेसा नाही. सत्यासत्यतेचा निर्णय हा उपलब्ध पोथ्यांचे प्रामाण्य आणि त्या आधारावर केलेला बुद्धिनिष्ठ अंदाज यांवरच करता येईल. त्यानुसार वादग्रस्त लीळा विक्षेपी मानणे हा पंथीयांच्या भावनेचा भाग होईल. पण तेवढ्याने त्या क्षेपक ठरविता येणार नाहीत. पुराव्याच्या कसोटीवर घासूनच या लीळा क्षेपक आहेत की नाहीत, हे ठरवावे लागेल. त्यामुळे डॉ. वि. भि. कोलते यांच्या प्रतीविषयीचा निर्णय संशोधक-अभ्यासकांच्या वादचर्चेतूनच घेणे, योग्य ठरणारे आहे.

**कोलते-प्रतीचा प्रभाव**

सांप्रदायिक संपादकांनी कोलते-प्रत नाकारून स्वतःची संपादने सिद्ध केली. तथापि ही संपादने करतानाही त्यांच्यावर कोलते-प्रतीचा फार मोठा प्रभाव राहिला. त्याची पहिली खूण म्हणजे पुनःस्थापनेच्या कल्पनेचा त्यांनी केलेला स्वीकार होय.

म्हाइंभटांनी शोधनी केलेली 'लीळाचरित्रा'ची आदिसंहिता ही समावेशक स्वरूपाची होती. या बृहद् ग्रंथातून सांप्रदायिकांच्या सोयीसाठी सूत्र, दृष्टान्त, प्रकरणवश, सैह्याद्रिचरित्र इ. भाग वेगळे करण्यात आले. त्यांचे स्वतंत्र ग्रंथ तयार केले गेले. यानंतर आदिसंहिता खालसेयाच्या धाडीत चोरीला गेली. त्यातून 'लीळाचरित्रा'चे पुनर्लेखन करताना स्वतंत्रपणे उपलब्ध असलेले हे सुटे अंश यथास्थानी समाविष्ट करण्याची गरज नंतरच्या शोधनीकारांना वाटली नाही. याचा परिणाम म्हणून पुनर्लेखनाच्या प्रतीकरण परंपरेत 'लीळाचरित्रा'ची खंडित संहिताच प्रसारित होत राहिली. आता संहिताचिकित्साशास्त्रानुसार आदिसंहितेचे प्रतिरूप पुनर्रचित करावयाचे असेल तर सूत्रे, दृष्टान्त इत्यादी सुटे अंश यथास्थानी समाविष्ट करणे आवश्यक आहे. ह. ना. नेने, डॉ. शं. गो. तुळपुळे किंवा 'लीळाचरित्रा'चे सांकेतिक लिपीत मुद्रण करणारे प्रकाशक-संपादक यांपैकी कोणालाही हा मुद्दा सुचलेला नव्हता. सूत्रे व दृष्टान्त इत्यादींचे यथास्थानी पुनःस्थापन ही अभिनव कल्पना मांडण्याचे श्रेय निर्विवादपणे डॉ.









वि. भि. कोलते यांचे आहे, कोलते-प्रत या प्रकारचा महत्त्वाकांक्षी प्रयत्न करते.

ही कल्पना इतकी सुयोग्य आहे की श्री. नरेंद्रमुनी अंकुळनेरकर, श्री. विद्याधरदादा पंजाबी, श्री. बिडकर-शास्त्री, प्रा. पुरुषोत्तम नागपुरे या सांप्रदायिक संपादकांनीही ही कल्पना स्वीकारली आणि ती यथाशक्ति, यथामति पूर्ण करण्याचा आपापल्या परीने प्रयत्न केला. त्यांच्या प्रयत्नातील अधिक-उणे महंत श्रीगोपीराजशास्त्री महानुभाव[१९] यांनी दाखविले आहे. उदाहरणार्थ, 'तिसहिया विरहिणीच्या दृष्टान्ता'चा प्रकरणवश उत्तरार्ध लीळा क्र. ८०६ हा असताना नागपूर-प्रतीत पूर्वार्ध लीळा क्र. ६३ मध्ये तिचे पुनःस्थापन करण्यात आले आहे. त्यांचेच अनुकरण करून विद्याधरदादा पंजाबी (हिराइसा पाठाचा भावार्थ) आणि पुरुषोत्तम नागपुरे यांनी या दृष्टान्तांचा चुकीचा प्रकरणवश दिला आहे. असे अनुकरणही सांप्रदायिक संपादनामध्ये आढळते. ते काहीही असले, तरी डॉ. कोलते यांच्या पावलांवर पावले टाकून या सांप्रदायिक संपादकांनी 'लीळाचरित्रा'च्या पूर्ण रूपाच्या पुनःस्थापनेचा प्रयत्न केला, हे मान्य करावे लागते.

स्वीकृत संहिता जशीच्या तशी न देता कोलते-प्रतीप्रमाणे पुनःस्थापित करून देण्याचा सांप्रदायिक संपादकांचा प्रयत्न राहिला आहे. त्यामुळे त्यांची संपादने काटेकोर अर्थाने 'ज्ञेयनिष्ठ' न राहता होयनिष्ठ व ज्ञातृनिष्ठ यांच्या मिश्रणाच्या स्वरूपाची झाली आहेत.

महंत लासूरकर आणि श्री. माधवराज पंजाबी यांची संपादने मात्र कोलते-प्रतीच्या प्रभावापासून मुक्त आहेत. त्यांची संपादने ही खऱ्या अर्थाने 'ज्ञेयनिष्ठ' संपादने आहेत.

डॉ. वि. भि. कोलते यांनी कठीण शब्दांचा अर्थ देणारी सूची जोडली आहे. त्याचप्रमाणे स्थलसूची, व्यक्ति-सूची, सूत्रसूची, दृष्टान्तसूची इत्यादी वेगवेगळ्या प्रकारची परिशिष्टेही परिश्रमपूर्वक तयार करून दिली आहेत. या मौलिक संदर्भसाहित्याची सांप्रदायिक संपादकांनी काही प्रमाणात उचल केलेली दिसते. ही सांप्रदायिक प्रतीवरील कोलते-प्रतीच्या प्रभावाची दुसरी खूण आहे.

**लीळासंख्येचा प्रश्न**

या संपादनांमुळे 'लीळाचरित्रा'च्या लीळासंख्येचा प्रश्न उभा राहतो. या निरनिराळ्या प्रतींच्या लीळासंख्येत लक्षणीय विविधता आहे. ह. ना. नेने प्रत (९२०), शं. गो. तुळपुळे प्रत (९२०), माधवराज पंजाबी मुरारिमल्ल-बास पाठ (१२२२), विद्याधरदादा पंजाबी-हिराइसा पाठाचा भावार्थ (लीळासंख्या १२७८), पुरुषोत्तम नागपुरे - हिराइसा पाठ (१३०६), कोलते प्रत-चिकित्सक प्रत (१४२५), नागपूर प्रत मुरारिमल्लबास पाठ (१५२५), देवदत्त आश्रमाचा 'स्मरणपाठ'–चरित्रकुसुमसमुच्चय (१८८५) अशा वेगवेगळ्या प्रतींतील लीळासंख्या वेगवेगळी आढळते. श्रीराघवमुनी आपल्या 'श्रीलीलाचरित्र आबाबा'त[२०] लीळा-संख्या देतात ती अशी –

द्वापारीच्या लीळा : त्या आठेचाळीस।  
सिहाद्रीच्या लीळा : संख्या सात।।७।।  
लीळा अज्ञातीच्या : गणित शंभर।  
आणिक त्यावर चोताळीस।।८।।  
पूर्वार्धाच्या लीळा : सातसे सवीस।  
उत्तरार्ध सासे : पंच्याण्णव।।९।।  
रुद्धपुरीचिया : तीनसे तेतीस।  
लीळाचा विशेष : काय वाणु।।१०।।  
आवघीया लीळा : त्या एकहजार।  
आठशते वर : बेताळीस।।११।।  
द्वारावतीचीया : मध्यें त्या आलीया।  
लीळा दुसरीया : आण नाही।।१२।।  
याही वेगळीया : लीळा त्या आणिक।  
आहेत क्षेपक : पाठांतर।।१३।।

द्वापारीच्या लीळा (४८), सिहाद्रीच्या लीळा (०७), अज्ञात लीळा (१४४), पूर्वार्ध (७२६), उत्तरार्ध (६९५), रूद्ध-पुरीच्या लीळा (३३०) अशा एकुण लीळा १८४२ आहेत. यातच द्वारावतीच्याही लीळा आहेत. याशिवाय ज्या वेगळ्या लीळा आहेत त्या क्षेपक आहेत, पाठांतरे आहेत, असे स्पष्ट सांगितले आहे. या सगळ्या आकड्यांची बेरीज १८४२ येते असे सांगितले आहे. पण ती प्रत्यक्षात १९५० येते. कोणत्याही संपादनात रुद्धपुरीच्या लीळा (३३०) समाविष्ट नसतात. तेव्हा 'लीळाचरित्रा'ची लीळा-संख्या उरलेल्या चरित्रांसह १६२० एवढी मानावी लागेल. केवळ पूर्वार्ध-उत्तरार्ध लीळासंख्या धरली तर ती १४२१ एवढी येईल. 'चरित्र आबाबा'कार श्रीमुरारिमल्लबासांच्या

चतुर्थ शोधनीचा उल्लेख करतात. तेव्हा ही संख्या त्यानंतरच्या काळातील संहितेत असणारी आहे, हे उघड आहे. ही संहिता आदिसंहिता नष्ट झाल्यानंतर जे पुनर्लेखन झाले, त्या परंपरेतील आहे. याचा अर्थ असा की, ही खंडित संहिता आहे. अर्वाचीन संपादक सूत्र-दृष्टान्त इत्यादींची पुनःस्थापना करीत आहेत. त्यामुळे त्यांची लीळासंख्या वाढणे स्वाभाविक आहे. एकूण 'चरित्र आबाबा'तील लीळासंख्येचा ताळमेळ त्यात दिलेल्या संख्येशी लागत नाही. त्याचप्रमाणे कोणत्याही संपादित प्रतीचा दुसऱ्या प्रतींशीही ताळमेळ लागत नाही. कोणत्या पद्धतीने गणना केली म्हणजे एखाद्या निश्चित लीळासंख्येजवळ पोचू, असेही दिसत नाही. तेव्हा या प्रश्नाचा वेगळ्या पद्धतीने विचार करावा लागेल.

आचार्य मुरारिमल्लबास पाठाच्या प्रतीत एका लीळेच्या दोन किंवा तीन लीळा केल्याची उदाहरणे डॉ. वि. भि. कोलते[२१] यांनी नोंदविलेली आहेत. त्यामुळे या पाठपरंपरेतील मु सारख्या प्रतीतील लीळांची संख्या फार फुगलेली आहे. हीच प्रवृत्ती 'स्मरणपाठा'सारख्या सर्वाधिक लीळासंख्येच्या (१८८५) प्रतीतही आढळते. महंत गोपीराजशास्त्री[२२] यांनी दाखविल्याप्रमाणे नागपूर-प्रत व कोलते प्रत यांत संपादकांनी तळटीपांमधून ज्या अधिकच्या लीळा संकलित केल्या आहेत, त्याही लीळा 'स्मरणपाठ'कारांनी संहितेत समाविष्ट केलेल्या आहेत. नागपूर प्रतीतून पंच्याण्णव टक्के आणि कोलते-प्रतीतून पाच टक्के लीळा 'स्मरणपाठा'त अंतर्भूत झाल्या आहेत. स्वामी ज्या गावांना कधी गेलेच नाहीत, त्यांचा निर्देश करणाऱ्या लीळाही नव्याने त्यात आल्या आहेत. स्वामी जेथे एकदाच गेले होते, तेथे दोन-तीन-चार वेळा गेल्याचे निर्देश करणाऱ्या लीळांमुळेही 'स्मरणपाठा'च्या लीळांची संख्या वाढलेली आहे.

एका लीळेच्या अनेक लीळा आणि अनेक लीळांची एकच लीळा असे वेगवेगळे प्रकार 'लीळाचरित्रा'च्या निरनिराळ्या प्रतींत आढळतात. याशिवाय 'प्रक्षेप' म्हणजे भर घालणे आणि 'अवक्षेप' म्हणजे काही भाग गाळून टाकणे, असेही प्रकार आढळतात. काही ठिकाणी लीळांचा क्रमही मागे-पुढे झालेला आहे. त्यामुळे लीळांची संख्या पाहण्यापेक्षा विशिष्ट लीळा संहितेत आहेत की नाही, याचा छडा लावणे महत्त्वाचे ठरते. आपल्या समोरच्या प्रतींतील लीळासंख्येचा प्रश्न डॉ. वि. भि. कोलते यांनी याच प्रकारे सोडविला आहे. केवळ चांगल्या लीळांच्या मोहाने त्यांचा संहितेत समावेश करण्याचे टाळले पाहिजे. "या वेगळें लीळांतु जऱ्ही नीकें असैल तऱ्ही तें क्षेपक जानावें" म्हणजे यापेक्षा वेगळ्या लीळांमध्ये जरी चांगले असले तरी ते क्षेपक आहे, असे जाणावे, हा मुरारिमल्लबासांचा इशारा कोणत्याही संपादकाने लक्षात ठेवावा, असाच आहे.

'लीळाचरित्र' संहिता वेगवेगळ्या अवस्थांमधून गेली. तिच्या पुनर्लेखनाच्या परंपरेत अनेक पाठ निर्माण झाले. त्यांची संख्या तीन, तेरा, पंधरा, पंचेचाळीस आणि एक्क्याण्णव अशी वेगवेगळी दिलेली आढळते. अशा पोथ्यांमध्ये जसा सारखेपणा आढळतो, तसा वेगळेपणाही आढळतो. आदिसंहिता नष्ट झालेली. पुनर्लिखित पाठांच्या मूळ पोथ्या अनुपलब्ध असून त्यांच्या नंतरच्या काळात केलेल्या नकलाच काय त्या उपलब्ध आहेत. अशा स्थितीत 'लीळाचरित्रा'ची कोणतीही एक हस्तलिखित किंवा मुद्रित प्रत सर्वांना मान्य होईल, अशी शक्यता दिसत नाही.

'लीळाचरित्रा'ची कोणती प्रत आधारप्रत म्हणून घ्यावयाची, याविषयी नागपूर-प्रतीच्या संपादक मंडळात जी चर्चा झाली, तीत गुर्जर शिवबासांचा पिढीपाठ, पारिमाण्डल्य पाठ आणि मुरारिमल्लबासांचा पाठ या तिन्ही पाठांचा आग्रह धरणारे वेगवेगळे सभासद होते. शेवटी मुरारिमल्लबासांचा पाठ निवडला गेल्यावर काही सदस्य या संपादनकार्यात सहभागी झाले नाहीत. नरेंद्रमुनी अंकुळनेरकर, विद्याधरदादा पंजाबी आणि इतर तेवीस महंत व विद्वज्जन यांनी हे काम तडीस नेले (इ.स.१९९३). त्यात प्रा. पुरुषोत्तम नागपुरे हेही विद्वान सहभागी होते. असे असताना सहभागी सभासदांनी लवकरच आपली स्वतःची स्वतंत्र संपादने सिद्ध केली. नरेंद्रमुनी अंकुळनेरकरांच्या मार्गदर्शनाने देवदत्त आश्रमाच्या शिष्यवृंदाने 'स्मरणपाठ' सिद्ध केला (इ.स.२००७). त्याचा उद्देश वेगवेगळ्या चरित्रकुसुमांचा समुच्चय करण्याचा होता. प्रा. पुरुषोत्तम नागपुरे यांनी सर्वाद्य व परंपरामान्य अशा हिराइसा पाठाचे संपादन केले (इ.स.२००४). हिराइसा पाठाचा भावार्थ विद्याधरदादा पंजाबी यांनी स्वतंत्रपणेही दिला.





'नागपुर प्रतीच्या उपोद्‌घातात कमळाइसेच्या घोकातील त्रुटी हिराइसा पाठात उतरलेल्या असल्याने त्याच्या प्रामाण्याविषयी विद्याधरदादा पंजाबी यांनीच शंका व्यक्त केलेली होती. माधवराज पंजाबी यांनी मुरारिमल्लबासांचा पाठ संपादित केलेला आहे. एकत्र संपादन करण्याऱ्या विद्वानांनी आपापली स्वतंत्र संपादने प्रसिद्ध करावीत, ही एकच बाब 'लीळाचरित्रा'च्या पाठप्रतीविषयी एकवाक्यता होणे किती कठीण आहे, हा मुद्दा स्पष्ट करते.

महानुभाव पंथाचे तेरा आम्नाय आणि चोवीस पक्ष आहेत. 'लीळाचरित्रा'च्या वेगवेगळ्या पाठपरंपरा त्यांच्यात प्रचलित असून त्या त्या गटापुरत्या त्या प्रमाण मानल्या जातात. अशा परिस्थितीत 'लीळाचरित्रा'ची कोणतीही पाठप्रत जशीच्या तशी देण्याचा, म्हणजे ज्ञेयनिष्ठ पद्धतीने संपादन करण्याचा प्रयत्न झाला, तरी तो सर्वमान्य होण्याची शक्यता दिसत नाही.

या सर्व पाठपरंपरांना आधारभूत असणारी म्हाइंभटांची जी आदिसंहिता होती, ती नष्ट झालेली आहे. तथापि वेगवेगळ्या पाठपरंपरांतील जुन्यातल्या जुन्या उपलब्ध प्रती संकलित केल्या आणि त्यांची संहिताचिकित्साशास्त्राच्या कसोटीवर शोधपूर्वक छाननी केली, तर त्या आदिसंहितेजवळ जाणारे प्रतिरूप सिद्ध करणे शक्य आहे. डॉ. वि. भि. कोलते यांची चिकित्सक-प्रत असा प्रयत्न करते. ती या सर्व भिन्न पाठपरंपरांच्या मागे असणाऱ्या आदिसंहितेचे अनुमान करू पाहते. साहजिकच अशी प्रत कोणत्याही उपलब्ध प्रतीसारखी किंवा विशिष्ट परंपरेत सामावणारी अशी असत नाही, हे संहिताचिकित्साशास्त्राला अभिप्रेतच असते. ती नष्ट झालेल्या आदिसंहितेचे स्वरूप पुराव्याच्या आधारावर अनुमानित करणारी पुनर्रचित प्रत असते. डॉ. वि. भि. कोलते यांची प्रत सर्वथैव निर्दोष आहे, असे आमचे मत नाही. तथापि त्यांनी निवडलेला मार्ग–ज्ञातृनिष्ठ संपादनाचा मार्ग आणि वापरलेली पद्धती–अभिनिवेश टाळून, वस्तुनिष्ठ शास्त्रीय पद्धती ही योग्य आहे, एवढेच आमचे म्हणणे आहे. ज्ञेयनिष्ठ संपादनांपेक्षा ज्ञातृनिष्ठ संपादनानेच आदिसंहितेच्या प्रतिरूपापर्यंत पोचता येईल.

पारंपरिक व्यासंग, परंपरेने विकसित झालेले महानुभावांचे संहिताचिकित्साशास्त्र यांच्या जोडीने नव्या संहिताचिकित्साशास्त्रावर प्रभुत्व असणारा असाच विद्वान. 'लीळाचरित्रा'ची पुनःस्थापना करू शकेल. ईश्वरप्रेमाने वेडावलेल्या आणि अखंड ज्ञानोपासना करणाऱ्या महंतांची आणि विद्वानांची एक अखंड परंपरा आपल्याला मराठी वाङ्मयाच्या इतिहासात तेराव्या शतकापासून दाखविता येते. त्यामुळे आज ना उद्या असा प्रज्ञावंत संपादक पुढे येईल, असा मनोमन विश्वास वाटतो.

**संदर्भ आणि टीपा :**


०१. स. गं. मालाशे, 'ग्रंथसंपादनाच्या समस्या : काही टिपणे', मराठी संशोधन पत्रिका, जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९७८ पृ. ५.

०२. र. बा. मंचरकर, 'लीळाचरित्र : संहितेची अवस्थांतरे', याच अंकात इतरत्र.

०३. 'महाराष्ट्रीय आद्य चरित्रकार महिन्द्रभट्ट संकलित लीळाचरित्र भाग १ – एकांक', ह. ना. नेने (संपा.), बाबू गोविंद सहाय, सिंगापूर द्वारा प्रकाशित, पां. ना. बनहट्टी (मुद्रक), नागपूर, तिसरी आवृत्ती, १९५४ (प. आ. १९३६ दु. आ. १९५१) हाच भाग मला पहावयास मिळाला. नेने संपादित 'लीळाचरित्रा'चे एकूण पाच भाग असून ते १९३६ ते १९५० या काळात प्रसिद्ध झाले.

०४. 'लीळाचरित्र', शं. गो. तुळपुळे (संपा.), सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे, १९६४ ते १९६७. एकांक (१९६४), पूर्वार्ध भाग १ व २ (१९६६) आणि उत्तरार्ध भाग १ व २ (१९६७).

०५. 'लीळाचरित्र' वि. भि. कोलते (संपा.), सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मंत्रालय, मुंबई, १९७८.

०६. 'लीळाचरित्र' उत्तरार्ध, भाग दुसरा, महंत लासूरकर (प्रका.), पारिमांडल्य प्रकाशन, परभणी, संशोधित सुधारित आवृत्ती, १९९२.

०७. 'श्री म्हाइंभट संकलित लीळाचरित्र', नरेंद्रमुनी अंकुळनेरकर (संपा.) विद्याधरदादा पंजाबी (कार्यकारी संपा.) व इतर, सचिव, महानुभाव मंडळ, नागपूर, १९९३, नागपूर-प्रत.

०८. 'आद्य मराठी ग्रंथ लीळाचरित्र (स्मरणपाठ)', नरेंद्रमुनी अंकुळनेरकर व देवदत्त आश्रमस्थ शिष्यवृंद

(संपा.), श्रीदेवदत्त प्रकाशन, जाधववाडी, ता. जुन्नर, जि. पुणे, नागपूर २००७.

०९. महंत श्री गोपीराजबाबा शास्त्री, रिद्धपूर, "लीळा-चरित्राचा स्मरणपाठ स्मरणीय किती?", महानुभाव, जुलै-ऑगस्ट २००९, पृ. ५ ते ११.

१०. 'म्हाइंभट संकलित चतुर्थ शोधनीचा पाठ सर्वज्ञाचे लीळाचरित्र', माधवराज पंजाबी (संपा. व प्रका.) किशोर प्रकाशन, अमरावती, प्रकाशनवर्ष दिलेले नाही.

११. 'लीळाचरित्र', पुरुषोत्तम नागपुरे, (संपा.), सौ. इंद्रायणी नागपुरे, ओंकार प्रकाशन, अमरावती, २००४.

१२. महंत श्री गोपीराजबाबा शास्त्री, 'लीळाचरित्राचा स्मरणपाठ स्मरणीय किती?', महानुभाव, जुलै-ऑगस्ट २००९ पृ. ८.

१३. 'लीळाचरित्र-हिराइसापाठाचा भावार्थ', विद्याधरदादा पंजाबी. ही प्रत मला लेख लिहिताना उपलब्ध झाली नाही.

१४. महंत श्री नागराजबाबा, 'लीळाचरित्राचे चतुर्थ शोधकार श्री मुरारिमल्लबास विद्वांस आणि विक्षेपी लीळा', समाविष्ट 'निमित्त' पद्मश्री भाऊसाहेब उपाख्य वि. भि. कोलते यांची जन्मशताब्दी, तु. वि. गेडाम (संपा.), महंत श्री साळकरबाबा, धुळे (प्रका.), धुळे-नागपूर, २००८, पृ. २०.

१५. तत्रैव, पृ. ८ ते २०.

१६. महंत श्री गोपीराजबाबा शास्त्री, 'लीळाचरित्राचा स्मरणपाठ स्मरणीय किती?' महानुभाव, जुलै-ऑगस्ट २००९, पृ. ९.

१७. तत्रैव, पृ. १०.

१८. तत्रैव, पृ. ११.

१९. तत्रैव, पृ. ५ ते ११.

२०. 'श्री राघवमुनीकृत श्रीलीळाचरित्र आबाब', समाविष्ट, 'महानुभवांची अन्वयस्थळे', रमेश वामन आवल-गावकर (संपा.), सौ. शशिकला उपाध्ये (प्रका.), चंद्रकला प्रकाशन, पुणे, १९९६, पृ. २४७ ते २५३.

२१. कोलते-प्रत, उनि.

२२. महंत श्री गोपीराजबाबा शास्त्री, 'लीळाचरित्राचा स्मरणपाठ स्मरणीय किती?' महानुभाव, जुलै-ऑगस्ट २००९, पृ. ६-७.

**टिपा :**

- प्रस्तुत लेखासाठी प्राचार्य खासेराव शितोळे, ई. श्री. राजधरदादा आराध्ये, प. पू. महंत श्री साळकरबाबा, धुळे, ई. श्री. मुकुंदराज अंकुळनेरकर यांनी महत्त्वपूर्ण साधनसामग्री पुरविली. याबद्दल या सर्व विद्वानांचा, महंतांचा मी आभारी आहे.
- 'लीळाचरित्रा'चे संपादन हे एक अविरत उद्योगाचे आणि प्रखर ज्ञानसाधनेचे काम आहे, याची मला पूर्ण कल्पना आहे. त्यामुळे सर्व संपादकांविषयी माझ्या मनात पूर्ण आदरभाव आहे. त्यांच्या महत्कार्याचा संक्षिप्त परिचय करून देणे, एवढाच माझा उद्देश आहे. तो मी तटस्थ अभ्यासकाच्या वस्तुनिष्ठ दृष्टीने करून दिला आहे. त्यात काही उणे-अधिक असेल, तर पुस्ती-दुरुस्तीसाठी माझे प्रतिपादन खुले आहे.



# आंबेडकरोत्तर दलित राजकारणाचे बदलते संदर्भ

प्रा. व्ही. डी. गायकवाड

भारतातील ब्रिटिशांचे आगमन ही भारतीयांच्या दृष्टीने खूप दूरगामी परिणाम करणारी घटना आहे. ब्रिटिश जर भारतात आले नसते, तर भारत मध्ययुगीन, सरंजामी पद्धतीचा राहिला असता. म्हणून १८व्या, १९व्या शतकांतील सर्व भारतीय सुधारकांनी ब्रिटिशांचे आभार मानलेले आहेत. ब्रिटिशांनी या देशाला ज्ञान, विद्या, तंत्रज्ञान, लोकशाही, कायद्याचे राज्य, स्वातंत्र्य, इंग्रजी शिक्षण इ. संधी उपलब्ध करून दिली, म्हणून तर म. फुले, डॉ. बाबासाहेब आंबडेकर हे ब्रिटिशांप्रति कृतज्ञता व्यक्त करतात.

भारतात संसदीय राजकारणाची सुरुवात ही खऱ्या अर्थाने ब्रिटिशांच्या आगमनाने झालेली दिसून येते. देशाला स्वातंत्र्य मिळण्यापूर्वी या देशात दोन समांतर चळवळी चालू होत्या. एक - ब्रिटिशांच्या विरोधातील स्वातंत्र्य प्राप्त करण्याची राजकीय चळवळ, दुसरी- येथील धर्माच्या, जातीच्या गुलामीतून मुक्त होऊ पाहणारी सामाजिक स्वातंत्र्याची सामाजिक चळवळ होय. दलितांच्या उन्नतीची व नेतृत्वाची सुरुवात ही खऱ्या अर्थाने ब्रिटिशांच्या सुधारणावादी व उदारमतवादी धोरणातून झाली. या धोरणाचाच एक परिणाम म्हणून या देशातल्या प्रत्येक जातिगटात स्वतःची राजकीय जाणीव निर्माण झाली. ब्रिटिशांनी इथे आधुनिक इंग्रजी शिक्षणाची सुरुवात केली, त्यामुळे कनिष्ठ जातींतील शिक्षणाचे प्रमाण वाढले व मध्यम वर्गाचा उदय झाला. याच मध्यम वर्गाने पुढे दलितांच्या राजकीय चळवळीची सूत्रे हातात घेतली.

सन १९२० मध्ये गांधींनी ब्रिटिशांच्या विरोधात 'असहकार चळवळ' सुरू केली. ही एक प्रकारची राजकीय चळवळ होती. या चळवळीतून दलित समाजाच्या राजकीय संघर्षाला चालना मिळाली. परंतु या समाजाला प्रभावी नेतृत्वाची गरज वाटत होती. याच वेळी दलित चळवळीला डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसारखा बुद्धिमान, विद्यासंपन्न, कणखर मनाचा व लढाऊ प्रवृत्तीचा पुढारी लाभला. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी प्रतिकूल परिस्थितीतून आपले उच्च शिक्षण पूर्ण केल्यानंतर अस्पृश्य बांधवांची जातिभेदातून मुक्ती हेच त्यांनी आपल्या जीवनाचे अंतिम ध्येय मानले. त्यासाठी 'मूकनायक', 'बहिष्कृत भारत', 'जनता' या नियतकालिकांमधून जातिभेदावर ओरखडे ओढले. त्याचबरोबर अस्पृश्य जनतेचे प्रबोधन सुरू केले. अस्पृश्यांना स्वाभिमान व प्रतिष्ठा मिळवून देण्यासाठी 'महाडचा चवदार तळे सत्याग्रह', 'काळाराम मंदिर प्रवेश', 'मनुस्मृती दहन' इ. सारखी अनेक आंदोलने घडवून आणली. याच दरम्यान म. गांधींच्या अस्पृश्यांसंबंधीच्या भूतदयावादी भूमिकेला विरोध केला.

सन १९३० मध्ये लंडन येथे गोलमेज परिषद (Round Table Conference) भरली. या परिषदेला दलितांचे प्रतिनिधी म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना बोलावले गेले. या परिषदेनंतर मात्र दलित चळवळीच्या ध्येयधोरणांत एक महत्त्वाचा बदल घडून आला. आतापर्यंत दलित पुढाऱ्याची भूमिका मुख्यतः समाजसुधारकाची होती; पण या परिषदेनंतर दलितांनी स्वतंत्रपणे राजकीय हक्क संपादन करण्याची महत्त्वाकांक्षा धरली. या परिषदेपासून त्यांनी राजकीय हक्कांच्या संरक्षणासाठी स्वतंत्र मतदारसंघाची मागणी केली. १९३० नंतर प्रतिकाराच्या चळवळीपासून बाजूला होऊन दलितांच्या स्वतंत्र राजकीय हक्कांवर डॉ. आंबेडकरांनी सर्व लक्ष केंद्रित केले. गोलमेज परिषदेतून म. गांधी व डॉ. आंबेडकरांतील मतभेद टोकाला गेले. याचा परिणाम म्हणून गांधीजी उपोषणाला बसले. तेव्हा राजकीय तडजोड म्हणून 'पुणे करार' (१९३२) घडून आला. पुणे करारामुळे खऱ्या अर्थाने दलितांचे खूप नुकसान झाले. राखीव मतदारसंघांऐवजी स्वतंत्र मतदारसंघ मिळणार होते. जात-पात, धर्म, देश वगैरे भेद मनात न आणता व राखीव मतदारसंघातून केवळ दलितांच्या मतावर निवडून येणे शक्य नाही; म्हणून १९३६ ला डॉ. आंबेडकरांनी 'स्वतंत्र मजूर पक्षाची'

अनुक्रमणिका

स्थापना केली. स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापना व कार्य हा महाराष्ट्रातील दलितांच्या चळवळीतील एक महत्त्वाचा टप्पा आहे. स्वतंत्र मजूर पक्षाच्या माध्यमातून आंबेडकरांनी समग्र शोषित जातिवर्गाचे राजकारण करण्याचा प्रयत्न केला खरा; परंतु नंतर 'अस्पृश्याचे नेते', 'कामगारांचे नेते' असा वाद निर्माण झाला. तेव्हा त्यांना अस्पृश्यांच्या मुक्तीसाठी त्यांचा नेता बनणे अधिक सोयीचे वाटत होते. तसेच दुसऱ्या महायुद्धाच्या काळात भारतात सत्तांतर होण्याची चिन्हे दिसू लागली. भारताची भावी राज्यघटना तयार होत असाताना दलितांच्या हिताचे रक्षण करायचे, तर त्यांची स्वतंत्र संघटना असणे जरुरीचे होते. म्हणून दलित पुढाऱ्यांनी वर्गवादी भूमिका सोडून जातिनिष्ठ भूमिका घेतली. याच भूमिकेतून डॉ. आंबेडकरांनी शे.का.-फे.(१९४६)ची स्थापना केली.

**रिपब्लिकन पक्षाची स्थापना :**

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी या देशातल्या समस्त बहुजनांना जोडून जातिअंत आणि वर्गअंताच्या लढ्यासाठी रिपब्लिकन पक्षाची संकल्पना मांडली होती. स्वतंत्र मजूर पक्ष व शे. का. फे. यांच्या मर्यादा लक्षात आल्या, तेव्हा जातिसंस्थेने पिळलेले आणि गरीब-श्रीमंताच्या विषमतेने पोळलेले सर्व एकत्र यावेत आणि त्यांनी आपल्या दास्यमुक्तीचा लढा लढावा, असा रिपब्लिकन पार्टी ऑफ इंडियाच्या स्थापनेमागचा हेतू होता. तसेच भारतातील लोकशाही स्थिर व मजबूत बनवावयाची असेल, तर काँग्रेसला पर्यायी असा एक प्रबळ विरोधी पक्ष अस्तित्वात आला पाहिजे, असे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे मत होते. म्हणून डॉ. आंबेडकरांनी रिपब्लिकन पक्षाची स्थापना करण्याचा आपल्या अनुयायांना आदेश दिला. मात्र हा पक्ष अस्तित्वात येण्यापूर्वीच डॉ. आंबेडकरांचे महापरिनिर्वाण झाले.

सन १९५६ला बाबासाहेबांचे महापरिनिर्वाण होते आणि अवघ्या दीड महिन्यानंतर बाबासाहेबांच्या मजबूत एकसंध चळवळीचे तुकडे होतात. महापरिनिर्वाणानंतर पोटजातींवरूनच बाबासाहेबांच्या अभेद्य चळवळीला आरपार चिरून काढले. महापरिनिर्वाणानंतर आंबेडकर अनुयायांनी आंबेडकरकुटुंबाचे नेतृत्व मान्य केले नाही. पुढे नेतृत्वावरून वाद निर्माण झाला व शेवटी सामूहिक नेतृत्वाची कल्पना पुढे आली. नागपूर येथे ३ ऑक्टोबर १९५७ रोजी शे. का. फे. विसर्जित करून रिपब्लिकन पक्षाची स्थापना करण्यात आली. मात्र रिपब्लिकन नेत्यांच्या संधिसाधू आणि लाचार मनोवृत्तीमुळे डॉ. आंबेडकरांचे स्वप्न रिपब्लिकन नेत्यांनीच धुळीस मिळविले. आज रिपब्लिकन पक्षाचे दोन डझन गटांत विभाजन झालेले आहे.

अहमदनगरचे दादासाहेब रूपवते, साताऱ्याचे बी. सी. कांबळे, कोकणचे आर. डी. भंडारे, मराठवाड्याचे भाऊसाहेब मोरे, अमरावतीचे रा. सु. गवई आणि चंद्रपूरचे बॅ. राजाभाऊ खोब्रागडे या सर्वांनी एकत्र येऊन बाबासाहेबांच्या पक्षाचे हे नेते आंबेडकरी विचाराला व चळवळीला पुढे नेण्याऐवजी गटागटांत विभागून चळवळीची शक्ती कमी करीत आहेत. ते अन्य पक्षांत सामील होण्यात धन्यता मानू लागले आहेत. इ. स. १९५७च्या सार्वजनिक निवडणुकीचा अपवाद वगळता त्यानंतरच्या कोणत्याही निवडणुकीत आंबेडकरी नेतृत्वाला राजकीय यश प्राप्त झाले नाही. डॉ. आंबेडकरांनी ज्या काँग्रेसला 'जळते घर' म्हटले, त्याच काँग्रेसकडून आज रिपब्लिकन नेत्यांना अपमानास्पद वागणूक मिळत आहे. रिपब्लिकन नेत्यांच्या फाटाफुटीमुळे आंबेडकरी जनतेची मते विखुरली गेली आहेत. स्वतःच्या राजकीय अस्तित्वालाच त्यांनी आंबेडकरी जनतेचे अस्तित्व समजून आंबेडकरी जनतेची दिशाभूल केलेली आहे. रिपब्लिकन नेत्यांनी काँग्रेसच्या पचनी पडेल तेच काम केले.

**रिपब्लिकन पक्षाच्या राजकारणाची महाराष्ट्राच्या विधानसभेतील कामगिरी (१९५२-२००९)**

| अ.क्र. | वर्ष | रिपाई पक्ष | प्राप्त जागा |
|---|---|---|---|
| १. | १९५२ | शे.का.फे. | ०१ |
| २. | १९५७ | शेकाफे | १३ |
| ३. | १९६२ | आरपीआय | ०३ |
| ४. | १९६७ | आरपीआय | ०५ |
| ५. | १९७२ | आरपीआय | ०२ |
| ६. | १९७८ | आरपीआय(खोब्रागडे) | ०२ |
| | | आरपीआय | ०२ |
| ७. | १९८० | आरपीआय (खोब्रागडे) | ०१ |








| अ.क्र. | वर्ष | रिपाई पक्ष | प्राप्त जागा |
|---|---|---|---|
| ८. | १९८५ | आरपीआय | – |
| ९. | १९९० | आरपीआय (खोब्रागडे) | ०१ |
| १०. | १९९५ | आरपीआय | - |
| ११. | १९९९ | आरपीआय (आठवले) | ०१ |
| | | भारिप | ०३ |
| १२. | २००४ | आरपीआय (आठवले) | ०१ |
| | | भारिप | ०१ |
| १३. | २००९ | भारिप | ०२ |
| | | **एकूण** | **३८** |

वरील सांख्यिकीय आकडेवारी पाहता रिपब्लिकन पक्षाला केवळ १९५७चा अपवाद वगळता कोणत्याही निवडणुकीत जास्त जागा मिळाल्या नाहीत. सन १९८० व ९५ ला राज्याच्या विधानसभेत एकही आरपीआय गटाचा आमदार झाला नाही. उलट, आरपीआय सोडून इतर राजकीय पक्षांत आरक्षित मतदारसंघात निवडून येणाऱ्या उमेदवारांचे प्रमाण वाढत आहे. याचा अर्थ असा होतो की, अंतर्गत गटातटांमुळे व इतर राजकीय पक्षांच्या प्रलोभनाला बळी पडून आरपीआयचे अस्तित्वच संपुष्टात आलेले आहे. खऱ्या अर्थाने आरपीआय नेत्यांनी (जनतेने नव्हे) बाबासाहेबांच्या विचाराचा व स्वपक्षाचा पराभव केलेला आहे.

सुरुवातीच्या काळात म्हणजेच पहिल्या पिढीचे नेतृत्व **दादासाहेब गायकवाड, बॅ. राजाभाऊ खोब्रागडे, आर. डी. भंडारे, बी. सी. कांबळे, एन. शिवराज, बी. पी. मौर्य, दादासाहेब रूपवते** इ. नी केले, तर १९७० च्या दशकात उदयास आलेले नेतृत्व म्हणजे **ॲड. प्रकाश आंबेडकर, रामदास आठवले, रा. सु. गवई, जोगेंद्र कवाडे, नामदेव ढसाळ, बॅ. राजा ढाले, टी. एम. कांबळे, सुलेखा कुंभारे, राजेंद्र गवई** इ. नी केले. यांपैकी फक्त ॲड. प्रकाश आंबेडकरांचा अपवाद वगळता उर्वरित सर्व रिपब्लिकन नेत्यांनी काँग्रेस पक्षाशी युती केलेली आहे. काही बौद्ध नेते इतर राजकीय पक्षांत काम करताना दिसतात. उदा, खा. एकनाथ गायकवाड, ना. वर्षा गायकवाड, आ. नितीन राऊत, आ. चंद्रकांत हंडोरे, संजय बनसोडे इ.

थोडक्यात, डॉ. आंबेडकरांनंतरच्या कालखंडात रिपब्लिकन पक्षाच्या नेत्यांनी पक्षबांधणीसाठी कोणताही ठोस प्रयोग व काम केलेले दिसून येत नाही. प्रत्येक गटाचा नेता तोच त्या गटाचा सर्वेसर्वा अशा स्वरूपाची पक्षाची ओळख निर्माण झाली आहे. रिपब्लिकन पक्ष हे फक्त निवडणुकीच्या काळातच परिचयाचे वाटतात. आज आस्तित्वात असलेला आंबेडकरी समाज विकासाच्या एका टप्प्यावर आहे. समाजात सुशिक्षित व जाणते लोक निर्माण झालेले आहेत. त्याचबरोबर आंबेडकरी चळवळीची चौथी पिढी उदयास आलेली आहे. या नवीन तरुणांना आकर्षित करण्यासाठी व त्यांना पक्षाशी बांधून ठेवण्यासाठी रिपब्लिकन पक्ष कोणताही अजेंडा देताना दिसून येत नाही. त्यामुळे हा नवतरुण वर्ग आज इतर पक्षांकडे आकर्षित होताना दिसत आहे.

**रिडालोस (रिपब्लिकन डावी लोकशाही समिती) : १७ पक्ष**

सन १९५८ ते १९९९ पर्यंत रिपब्लिकन पक्षात अनेक वेळा ऐक्य झाले; पण हेच ऐक्य नेत्यांनीच मोडलेले आहे. आजपर्यंत रिपब्लिकन पक्षात झालेले ऐक्य हे पक्ष व जनतेच्या हिताचे नव्हते तर पुढाऱ्यांनी आपल्या नेतृत्वासाठी, सत्तेच्या खुर्चीसाठी व स्वार्थासाठी केलेले ते फसवे ऐक्य होते. रिडालोसच्या संदर्भात विचार करत असताना ही समिती निर्माण होण्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे २००९ च्या १५ व्या लोकसभा निवडणुकीत रिपब्लिकन गटाचा एकही उमेदवार निवडून आला नाही. (हेतुपुरस्सर निवडून येऊ दिले नाही.) तेव्हा मा. आठवलेंनी लोकसभा निवडणुकीतील पराभवाचा वचपा काढण्यासाठी रिपब्लिकन ऐक्यासाठी पुढाकार घेतला. महाराष्ट्रातील १३ ऑक्टोबर २००९ च्या विधानसभेकरिता रामदास आठवले, जोगेंद्र कवाडे यांनी पुढाकार घेऊन महाराष्ट्रातील समविचारी संस्था, संघटना एकत्रित करून नवा तिसरा पर्याय देण्याचा प्रयत्न केला. पण या ऐक्यात ॲड. प्रकाश आंबेडकर, गवई गटाचे डॉ. राजेंद्र गवई, टी. एम. कांबळे हे तीन नेते सामील झाले नाहीत. तेव्हा ऐक्याचा हा बार फुसकाच निघाला. परंतु रामदास आठवले, प्रा. जोगेंद्र कवाडे व नामदेव ढसाळ हे या

ऐक्यप्रक्रियेत सामील झाले. तसेच इतर समविचारी नेते- त्यांत प्रा. एन. डी. पाटील, कॉ. राजू शेट्टी, खा.अबू आझमी, डॉ. अशोक ढवळे, आ. कपिल पाटील आणि महादेव जानकर इ. व इतरही अनेकजण सहभागी झाले. या आघाडीचे निमंत्रक म्हणून रामदास आठवले हे होते. या आघाडीने महाराष्ट्रभर उमेदवार उभे केले. विदर्भातील काही बंडखोर आमदारांनी रिडालोसला समर्थनही दिले. त्यात अमरावती डॉ. सुनिल देशमुख, रवी राणा(वडनेरा), डॉ. सुरेश देशमुख (वर्धा) इ. तसेच सत्यशोधकी कम्युनिस्ट, जनता दल, लोकभारती, सोशॅलिस्ट फ्रंट, लोकजनशक्ती पार्टी, युक्रांद यांसारख्या समाजवादी संघटना सामील झाल्या.

विधानसभा निवडणुकीचा निकाल जाहीर झाला. रिडालोसला ११ जागांवर समाधान मानावे लागले. या ११ जणांत शेकाप, सपा, कम्युनिस्ट, स्वाभिमानी शेतकरी संघटना यांचे उमेदवार निवडून आले. रिपब्लिकन ऐक्यवादी १०७ उमेदवार उभे असताना एकही उमेदवार निवडून आला नाही, ही गोष्ट सर्वच रिपब्लिकन नेत्यांना आत्मपरीक्षण करायला लावणारी आहे.

**रिडालोसची कामगिरी (२००९) राज्य विधानसभा**

| पक्ष | लढवलेल्या जागा | प्राप्त जागा |
|---|---|---|
| बसपा | २८८ | ०० |
| रिडालोस | १७८ | ११ |
| रिपाई (यु) | ११० | ०० |
| रिपाई(अ) | ०२ | ०० |
| भारिप | १०२ | ०२ |

| पक्षनिहाय कामगिरी | प्राप्त जागा |
|---|---|
| शेतकरी कामगार पक्ष | ०४ |
| कम्युनिस्ट पक्ष | ०१ |
| समाजवादी पक्ष | ०४ |
| राष्ट्रीय समाज पक्ष | ०१ |
| लोकभारती पक्ष | ०१ |
| एकूण | ११ |

रिडालोसने पाठिंबा दिलेले ४ अपक्ष निवडून आले. रिडालोसमधील विशेषतः रिपाईला आलेले अपयश हे आंबेडकरी समाजाच्या खूप जिव्हारी लागले आहे. पराभवाची कारणे शोधली असता लक्षात येते की, १. रिपाईचे संघटन ग्रासरूटवर नव्हते. २. प्रचारयंत्रणा गांभीर्याने राबवली गेली नाही. ३. प्रचाराच्या जाहीरनाम्यातील मुद्दे योग्य नव्हते. ४. रिपाई नेत्यांची वक्तव्ये संभ्रमित होती. ५. पैशाच्या मोबदल्यात मतदारांनी आपली मते अन्यत्र फिरवली. ६. अंतर्गत बंडखोरी झाली. वरील कारणांमुळे रिपाई पक्षाला दारूण पराभवाला सामोरे जावे लागले.

संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीनंतर प्रथमच अशा स्वरूपाची एकूण १७ पक्षांची महाआघाडी रिडालोसच्या माध्यमातून उदयास आली. पण या निवडणुकीने रिपाई नेत्यांना भानावर आणले. आजवर आंबेडकरी जनता आपल्याच हक्काचा मतदार आहे, असे त्यांना वाटत होते. या निवडणुकीने समाजाला रिपब्लिकन पक्षाकडे वळवण्याचे एक मोठे आव्हान उभे आहे. भविष्यात नेतृत्व करणाऱ्यांना स्वीकारावे लागेल. अर्धशतकाहून अधिक काळ लोटला तरी पक्षाला मान्यता व निवडणूक चिन्ह मिळू शकले नाही, ही दुर्दैवाची गोष्ट आहे. या अवनतीला खऱ्या अर्थाने सर्वस्वी नेते, कार्यकर्ते, पदाधिकारी व अनुयायी जबाबदार आहेत.

**भीमशक्ती व शिवशक्ती — २०११**

महाराष्ट्रातील राजकारण हे मराठा जातीभोवती फिरत असते. मराठा ही जात प्रामुख्याने कॉंग्रेस व राष्ट्रवादी पक्षात मोठ्या प्रमाणात आहे.

महाराष्ट्रातील दलितांची मते घेऊन सत्ता मिळविण्याचा प्रकार आजपर्यंत कॉंग्रेसने केलेला आहे. त्यासाठी कॉंग्रेसच्या पुढाकाराने रिपाई ऐक्य घडवून आणण्याचा प्रयत्न झालेला दिसून येतो. याचा प्रतिप्रयत्न म्हणून भाजपा-शिवसेनेने दलितांच्या साह्याने कॉंग्रेस-राष्ट्रवादीला सत्तेपासून दूर ठेवण्याचा एक भाग म्हणून व सामाजिक समरसतेची भूमिका भाजप व रा. स्व. संघ परिवाराकडून घेतली जात आहे. तर शिवशक्ती –भीमशक्तीच्या सामंजस्याची भूमिका शिवसेनेकडून घेतली जात आहे.

२००९च्या १५व्या लोकसभेच्या निवडणुकीत रामदास आठवले यांचा शिर्डी मतदारसंघातून जाणूनबुजून पराभव करण्यात आला. तेव्हापासून रामदास आठवलेंनी राष्ट्रवादी

काँग्रेस व काँग्रेसची मैत्री सोडून दिली. १३ ऑक्टो. २००९च्या विधानसभा निवडणुकीत आठवलेंनी आपल्या पराभवाचा वचपा काढण्यासाठी रिडालोसची निर्मिती केली. पण हा प्रयोग रिपाईवर उलटला. तेव्हा काँग्रेसचा धूर्तपणा व वापरून घेण्याचे तंत्र पाहता आठवलेंनी विरोधी पक्षाशी युती करून काँग्रेसला सत्तेवरून खेचण्या-साठी भीमशक्ती –शिवशक्ती युतीची शक्यता वर्तवलेली आहे.

मुळात शिवसेनेशी रामदास आठवलेंची युती ही राजकीय पुनर्वसनात आपले महत्त्व वाढवण्याचाच एक भाग आहे. जर आठवलेसाहेब शिर्डीत पराभूत झाले नसते, तर ही युती झाली असती का? हा प्रश्न आहे. पण राजकारणात सत्तेची गणिते ठरवीत असताना जरतरला महत्त्व नसते. कोणत्याही राजकीय पक्षाला किंवा नेत्याला राजकीय सत्तेची नशा चढलेली असते. म्हणून ते नेहमी नवीन राजकीय पर्यायाच्या शोधात असतात. मग ते रामदास आठवले असोत वा शरद पवार.

भीमशक्ती व शिवशक्ती युतीचा वरील दृष्टीकोणातून विचार करता हा प्रयोग घडून येऊ शकतो किंवा नाही; पण या युतीच्या प्रयोगामागे दोघांची राजकीय रणनीती असूही शकते. म्हणजेच राजकीय चाचपणी. संभाव्य युतीचे काय पडसाद महाराष्ट्राच्या राजकारणावर घडून येतील, हाही हेतू असू शकतो. कारण मुंबईत शिवसेनेला मनसेला लगाम घालायचा आहे, तर आठवलेंना काँग्रेस-राष्ट्रवादीला आपली ताकद दाखवायची आहे. महाराष्ट्राच्या राजकारणासंदर्भाबाबत इतिहासात दृष्टिक्षेप टाकता असे लक्षात येते की, रिपाईला कुणाशी ना कुणाशी युती करूनच राजकारण करावे लागेल, हे उघड आहे. रिपाईने पक्षबांधणीला पुरेसा वेळ दिला नसल्यामुळे आज रिपाईची अवस्था वाईट झालेली आहे. आंबेडकरी समाजातील जो तरुण वर्ग आहे, या वर्गाला रिपाईने पर्याय दिला नसल्यामुळे हा तरुण वर्ग इतर राजकीय पक्षांकडे आक-र्षित होत आहे. त्याचाच एक भाग म्हणून रिपाईची शिवसेना-भाजपशी युती करण्यास दलित वर्गातून काहीसे वातावरण निर्माण झाले आहे. शिवसेना व भाजपबद्दल काही पारंपारिक राजकीय आक्षेप आहेत. हे आक्षेप दूर करूनच आपणास पुढील पावले उचलावी लागतील. युती ही केवळ सत्तेसाठी असता कामा नये; तर ती समाजपरिर्वन व आंबेडकरी विचाराची बांधीलकी जपणारी असली पाहिजे. बाबासाहेबांच्या विचारावर आधारितच राजकीय समीकरणे ठरली पाहिजेत. बाबासाहेबांची चळ-वळ एकाच वेळी राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक स्वरूपाची होती. पण बाबासाहेबांच्या पश्चात परिवर्तनवादी चळवळीचा लढा फक्त राजकीय मुद्द्याभोवती फिरला आहे. असे होता कामा नये. "दलितांनी राज्यकर्ती जमात व्हावे!", " राजकारण ही विकासाची गुरुकिल्ली आहे." (संदर्भ-१९४२ सोलापूरची सभा, १९४४ कानपूर येथील शे. का. फे. संमेलन) वरील वाक्यांचा दलित नेत्यांनी शब्दशः अर्थ घेतलेला आहे. त्यानुसार सत्तापदापर्यंत तडजोडी करून पोचणे हेच रिपाई गटाचे राजकारण राहिलेले आहे.

राजकारणात अशा अनेक युती-आघाड्या यांचे प्रयोग होत असतात. ते यशस्वी होतातही व मोडतातही, म्हणून शिवशक्ती-भीमशक्ती या युतीकडे पाहिले असता एक राजकीय उलथापालथ होऊ शकते. कारण बहुजन समाज हा शिवसेनेचा आधार आहे. दलित आणि बहुजन एकत्र आले तर सत्तेची समीकरणे बदलूही शकतात. काँग्रेस-राष्ट्रवादीने शिवसेना व भाजपशी अनेक मतदारसंघात तसेच महानगरपालिका, जिल्हा परिषदा व नगरपालिकांत युती केली, की आंबेडकरी विचारधारेचा प्रश्न उपस्थित केला जातो. राजकारणात विचारधारा जपण्याची मक्तेदारी काय रिपाईचीच आहे का? सामाजिक परिवर्तनाच्या लढाईत रिपाई किंवा तिचा कोणताही गट आंबेडकरी विचारधारेपासून कदापिही दूर जाणारच नाही. या युतीने सत्ता जरी मिळवली नाही, तरी किमान सत्तेत सहभागी होता तर येईल.

वरील विश्लेषणावरून असे लक्षात येते की, महा-राष्ट्राच्या राजकारणातील दलित नेतृत्वाच्या प्रभावाकडे पाहिले असता ते राजकारणात निर्णायक ठरू शकतात; पण त्यांच्यातील फूट, ऐक्याचा अभाव किंवा नेतृत्वाचा वाद याचा फायदा राजकीय पक्ष घेत आहेत. त्यामुळे दलितांची मते व नेतृत्व विभाजित होऊन राजकारणावर प्रभाव पाडण्यात दलित नेतृत्व अपयशी होत आहे. म्हणून महाराष्ट्राच्या भावी राजकारणात दलित नेतृत्वाला निर्णायक

भूमिका निभावायची असेल, तर समान व सर्वमान्य विचारधारेचा अंगीकार करायला पाहिजेच. कारण ओबीसी नेते गोपीनाथ मुंडे, छगन भुजबळ हे जर सत्तेत महत्त्वाची पदे लोकसंख्या कमी असतानाही उपभोगत असतील, तर राज्याच्या एकूण लोकसंख्येच्या ९ टक्के असलेला दलित समाज व दलित नेतृत्व कोणतेही राजकीय पद उपभोगू शकते. पण याची जाणीव नेते, कार्यकर्ते, अनुयायी व समाजास होणे गरजेचे आहे.

**संदर्भ –**


संदर्भ दलित चळवळीचा – भा. ल. भोळे, बजाज पब्लिकेशन, एप्रिल २००८.

महाराष्ट्रातील सत्तासंघर्ष – संपादक सुहास पळशीकर व सुहास कुलकर्णी, मनोविकास प्रकाशन,२००७.

आंबेडकरी राजकारणाचा अन्वयार्थ – ताराचंद खांडेकर, साकेत प्रकाशन, नागपूर २००७.

परिवर्तन आणि प्रबोधन – ऋषीकेश कांबळे, चिन्मय प्रकाशन, औरंगाबाद, २०१०.

महाराष्ट्राच्या राजकारणातील दलित नेतृत्व – प्रा. व्ही. डी. गायकवाड, सत्याग्रही विचारधारा, पुणे फेब्रु.२००९.

आंबेडकरी राजकीय चळवळीचे बदलते स्वरूप रिडालोसच्या संदर्भात – डॉ. बाबासाहेब आंबेडकर प्रेरणा विशेषांक, डिसें.२०१० सुगावा विशेषांक

महाराष्ट्र वार्षिकी २०१० – तुकाराम जाधव, युनिक ॲकॅडमी प्रकाशन, पुणे, २०१०

शासनकर्ती जमात कशी होणार? – विशेष– दै. लोकसत्ता, २३ फेब्रु. २०११, जगदीश नगरकर.

शिवशक्ती व भीमशक्ती युती कधी? – महादेव जोंधळे, दै. सकाळ, २०११.




## लेखकांचा परिचय

❋ **प्रा. म. अ. मेहेंदळे**

माजी प्राध्यापक, संस्कृत विभाग व माजी सहयोगी प्रमुख संपादक, संस्कृत कोश विभाग, डेक्कन कॉलेज, पुणे; संपादक, महाभारताचा सांस्कृतिक कोश, भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिर, पुणे. वैदिक वाङ्मयातील प्रश्नोत्तरे (१९८०), भारतीय द्यूत (१९९०), पू. विनोबाकृत ऋग्वेद-सारचे मराठी भाषांतर (१९८२), जरथुश्त्राच्या गाथांचे मराठी भाषांतर (१९९४) या ग्रंथांचे लेखक; नवभारतात लेखन.

***पत्ता :*** द्वारा/ कर्नल प्रदीप मेहेंदळे (निवृत्त) ५४, प्रशांत गृहरचना संस्था मर्या., पौड रस्ता, कोथरूड, पुणे - ४११ ०३८.

❋ **श्री. सी. पं. खेर**

क्रांतिकारी अर्थशास्त्रज्ञ जॉन मेनार्ड केन्स्, सौ. कुसुम खेर, पुणे (१९९७); राज्यार्थ शास्त्रज्ञ जॉन केनेथ गालब्रेथ, दिलीपराज प्रकाशन, पुणे (१९९९) व जागतिक अर्थशास्त्राचे बदलते संदर्भ, दिलीपराज प्रकाशन, पुणे (२००४) ही पुस्तके प्रसिद्ध.

***पत्ता :*** बी-७ (पूर्व) वृंदावन सोसायटी, रेंज हिल्स रोड, पुणे ४११ ०२०. भ्रमणध्वनी : ०२२-२५५४०१८२.

❋ **श्री. प्रभाकर कुलकर्णी**

एम. ए. (इंग्रजी), ज्येष्ठ पत्रकार, प्रादेशिक व राष्ट्रीय वर्तमानपत्रांमध्ये विपुल लेखन.

***पत्ता :*** एफ-६, श्री अपार्टमेन्ट, स्टेट बँक कॉलनी रोड, हनुमाननगर, कोल्हापूर. दूरध्वनी : ९०११०९९३१५.

❋ **श्री. रत्नाकर बापूराव मंचरकर**

मराठीचे सेवानिवृत्त अध्यापक, मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचे अभ्यासक, साहित्य, शिक्षण आणि समाज यांवर वैविध्यपूर्ण लेखन, संपादन व शोधनिबंधलेखनाबद्दल राज्यपुरस्काराने सन्मानित.

***पत्ता :*** श्री स्वामी समर्थ, १९, नंदनवन कॉलनी, कोहिनूर मंगल कार्यालयासमोर, सावेडी, अहमदनगर - ४१४ ००३.

❋ **प्रा. व्ही. डी. गायकवाड**

विभागप्रमुख, पदवी व पदव्युत्तर राज्यशास्त्र विभाग, शिवाजी महाविद्यालय, उदगीर

***पत्ता :*** राज्यशास्त्र विभाग, शिवाजी महाविद्यालय, उदगीर ४१३ ५१७. जि. लातूर (महाराष्ट्र) भ्रमणध्वनी : ९४२३३४३४७३.

अनुक्रमणिका

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# वैदिक संस्कृतीचा विकास

(तिसरी आवृत्ती, १९९६)

**प्रा. मे. पुं. रेगे यांच्या विवेचक पुरस्कारासह**

वैदिक संस्कृतीचा विकास ह्या बृहद् ग्रंथात शास्त्रीजींनी अधिकाराने आणि कौशल्याने आपल्या प्रदीर्घ सांस्कृतिक वारशाचे आत्मीयतेने पण चिकित्सकपणे परीक्षण केले आहे. त्यांच्या संस्कृत वाङ्मयाच्या व्यासंगाच्या व्याप्तीची कल्पना या ग्रंथावरून चांगली येते. वैदिक वाङ्मय, दर्शने, महाकाव्ये, शास्त्रे, पुराणे, बौद्ध व जैन साहित्य इत्यादी सर्व शाखांतील संस्कृत साहित्याचा त्यांनी आपल्या विवेचनात पुरेपूर उपयोग केला आहे. वैदिक संस्कृतीची समावेशक, उदार, विधायक बाजू त्यांनी उलगडून दाखविली आहे.

**डेमी आकाराची ३६+ ५७२ पृष्ठे** **किंमत रू. ३००/-**

**प्राज्ञपाठशाळा मंडळ**
३१५, गंगापुरी, वाई, जि. सातारा

अनुक्रमणिका

वैदिक, संस्कृत भाषाशास्त्र

महाभारत – रामायण – भगवद्‌गीता,

संस्कृत वाङ्मय यांचे गाढे अभ्यासक व रसिक समीक्षक

**प्राच्यविद्यापंडित डॉ.म.अ.मेहेंदळेकृत**

# प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती

**निवडक मौलिक लेखांचा संग्रह**

*प्रा.मे.पुं. रेगे यांच्या विवेचक प्रस्तावनेसह*

**डेमी आकाराची ३८ + ५१६ पृष्ठे, पुठ्ठा बांधणी**
**किंमत : रु. ५५०/–**

---

*संपर्कासाठी पत्ता*

**चिटणीस, प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५, गंगापुरी,**
**वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**

## लेखकांस आवाहन

'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.

४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका